


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# श्रद्धांजली

ज्येष्ठ समाजवादी कार्यकर्त्या, समाजवादी महिला सभेच्या माजी अध्यक्ष आणि सल्लागार श्रीमती सुमनताई दाभोलकर यांचे २७ जुलै २००८ रोजी निधन झाले. प्राज्ञपाठशाळा मंडळाचे विद्यमान संचालक आणि आधारस्तंभ, पुणे विद्यापीठाचे माजी कुलगुरू प्रा. देवदत्त दाभोलकर यांच्या त्या सुविद्य पत्नी. मराठवाडा नामांतर आंदोलन तसेच नर्मदा बचाव आंदोलनात त्यांचा सक्रीय सहभाग होता. प्राज्ञपाठशाळा मंडळ तसेच 'नवभारत'चे संपादक मंडळ यांची त्यांना विनम्र श्रद्धांजली.

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६१ । अंक ११ । ऑगस्ट २००८
आषाढ/श्रावण शके १९३०
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).



अनुक्रमणिका








# नवभारत

ऑगस्ट २००८

अनुक्रमणिका



लेखकांचा परिचय


❑ **प्रा. र. ग. दांडेकर**

निवृत्त तत्त्वज्ञान विभाग प्रमुख, राजस्थान आर्य महाविद्यालय, वाशिम, विदर्भ.

*पत्ता :* १०३, धनश्री बिल्डिंग, स्वरनगरी, आनंदनगर, सिंहगड रोड, पुणे–५१.

❑ **प्रा. प्रसन्नकुमार अकलूजकर**

वृत्तपत्रलेखक, केसरीतील माजी संपादक आणि आता पुणे विद्यापीठाच्या वृत्तपत्रविद्या विभाग येथे प्राध्यापक.

*पत्ता :* वृत्तपत्रविद्या विभाग, रानडे इन्स्टिट्यूट, फर्ग्युसन कॉलेज रस्ता, पुणे–४११ ००४.

❑ **डॉ. द. तु. पाटील**

मराठीचे प्राध्यापक, भाऊराव काकतकर महाविद्यालय, बेळगाव. काही मराठी कथा प्रसिद्ध, समीक्षण व अनुवादाचे लेख प्रसिद्ध.

*पत्ता :* भाऊराव काकतकर महाविद्यालय, क्लब रोड, बेळगाव ५९०००१.


मुखपृष्ठ : आदिमानवांचे स्थलांतरण










# सामाजिक सुधारणा आणि अंधश्रद्धा निर्मूलन

प्रा० र० ग० दांडेकर

गोपाळ गणेश आगरकर हे सुधारक म्हणून प्रसिद्ध सुधारक विचारांचा पाठपुरावा, प्रसार आणि प्रचार करण्यासाठी त्यांनी 'सुधारक' हे वर्तमानपत्र चालविले. त्यांच्या पुरोगामी विचारांबद्दल जिवंतपणी त्यांची लाक्षणिक प्रेतयात्राही काढली गेली. तरीसुद्धा ते त्यांच्या मतांशी आमरणांत प्रामाणिक आणि चिकटून राहिले. इंग्रजी भाषा आणि विचारांच्या संपर्कात तत्कालीन तरुण वर्ग येऊ लागला होता. लोकमान्य आगरकरादि पदवीधरांचा परिचय इंग्रजी विचारवंतांच्या लिखाणाशी झाला होता.

लोकमान्यांच्या गीतारहस्यावरून असे म्हणता येईल की, ज्या बेंथॅम, मील, प्रभृति नीतिशास्त्रज्ञांच्या, राजकीय विचारावंताच्या लिखाणांनी आगरकर प्रभावीत झाले होते. त्यांच्या नीतिविचारांतील न्यूनता व अग्राह्यता लोकमान्यांनी दाखविली आहे.

सुधारकाग्रणी आगरकरांचा लढा हा अंधश्रद्धे विरुद्धच होता. कारण सामाजिक आचार, व्यक्तीव्यक्ती मधील आचरण, व्यवहार हा सामान्यतः परंपरा, रूढी, धर्मग्रंथ, शास्त्रवचन यावर आधारलेला त्याला धरून असा असतो आणि आहे. याप्रमाणे केलेले वर्तन योग्य आहे की अयोग्य आहे, माणुसकीला धरून आहे की अमानुष आहे. त्यांत बदल होऊ शकत नाही का? याचा विचारच नसतो. आपल्या रुढीप्रमाणे शास्त्र वचनाप्रमाणे इत्यादी केलेल्या आचरणाचे परिणाम एकूण व्यक्तीच्या किंवा मनुष्यप्राण्याच्या दृष्टीने हितावह, सौख्यदायी, उपकारक आहे की नाही याचा सारासार विचार त्यामध्ये नसतो अशा मनोवृत्तीला अंधश्रद्धा म्हणता येईल.

मानवी आचरणाच्या इष्ट अनिष्टतेचा विचार परिणाम सापेक्ष असतो एवढाच बुद्धिप्रामाण्य, विवेक यांचा अर्थ आगरकर प्रणित सुधारणेच्या संदर्भात होतो.

बेंथॅम मील स्पेन्सर प्रभृति हे 'विवेकवादी' नाहीत. तशी त्यांची भूमिकाही नाही आणि तशी त्यांना विवेकवादी म्हणून संज्ञाही नाही.

मानवी आचरणाच्या योग्यायोग्यतेचा/ इष्ट-अनिष्टतेचा निकष परिणाम सापेक्ष असतो ही भूमिका विवेकवादी नाही. नीतिनिकष परिणाम निरपेक्ष असतो ही भूमिका विवेकवादी म्हणून प्रसिद्ध आहे.

आचरणाच्या योग्य-अयोग्यतेचा, इष्ट-अनिष्टतेचा, चांगले-वाईटपणाचा विचार त्याच्या निकषाचा विचार निश्चितच नीतिशास्त्राचा विषय आहे. हे आगरकरांच्या सुधारणाविषयक भूमिकेचा अभ्यास करताना लक्षात ठेविले पाहिजे. विशेषतः विवेक, बुद्धी, सारासार विचार या संकल्पनांचा विचार करताना.

अंधश्रद्धानिर्मूलन वादामध्ये १) ईश्वराचा त्याग केला पाहिजे, २) ईश्वरच सर्व अंधश्रद्धांचे उगमस्थान आहे, असे विधान आहे.

विवेकाचा कांटप्रणित अर्थ घेतला तरी विवेकवादी असलेल्या इमॅन्युअल कांटच्या मतांप्रमाणे 'ईश्वर तर्काने जसा सिद्ध होत नाही, तसा तो असिद्धही होत नाही.'

२) 'ईश्वर' सर्व अंधश्रद्धांचे उगमस्थान आहे. हे सिद्ध करण्यासाठी एकतर ईश्वर संकल्पनेतच सर्व अंधश्रद्धांचे उगमस्थान, याचा अंतर्भाव करावा लागेल व तसा तो केल्यास आत्माश्रयाचा दोष घडतो (जे सिद्ध करायचे तेच गृहीत धरणे) किंवा ते सांखींकी पद्धतीने सिद्ध केले पाहिजे. अन्यथा या दोन्ही विधानांना एक हट्टाग्रही समज यापलीकडे महत्त्व राहणार नाही.

आगरकरांच्या कारणांमध्ये अंधश्रद्धानिर्मूलना विरोधी एक नवे परिमाण स्वातंत्र्योत्तर काळांमध्ये निर्माण झाले आहे. ते परिमाण म्हणजे जाति आणि धर्म यांचा निवडणुकीतील निर्णायक प्रभाव.

या पार्श्वभूमीवर अंधश्रद्धानिर्मूलन ही

अनुक्रमणिका

धर्मनिरपेक्ष चळवळ असल्याने हिंदुस्थानातील खिश्चन, मुसलमान इत्यादि धर्मांतील अंधश्रद्धा सुद्धा अधोरेखीत करून त्याविरुद्ध चळवळी उभ्या केल्या पाहिजेत. धर्मनिरपेक्ष रीतीने आणि ही चळवळ एकाच व्यासपीठावर असावी म्हणजे त्याला अधिक बळकटी येईल. (हा लेख लिहीत असतांना विचारप्रक्रियेमध्ये एक यांशी म्हणजे वरील कल्पनेशी सुसंगत नसलेला एक विचार आला तो पुढे लिहीत आहे.)

ईश्वराचा जर त्याग केला पाहिजे आणि ईश्वराशिवाय जर धर्म नाही (ईश्वर नाकारणाऱ्या जैन, बौद्धांनी सुद्धा गौतमबुद्धांना आणि महावीरांना 'सर्वज्ञता' प्रदान केली आहे.) तर धर्मनिर्मूलनच अंधश्रद्धा-निर्मूलनवादाचे फलित किंवा अंतिम उद्दिष्ट राहील.

आगरकर जरी स्वतः अज्ञेयवादी असले तरी त्यांचा सुधारणावाद हिंदुधर्मातील अमानुष, अनिष्ट, भयावह रुढी चालीरीति दुर्व्यवहार बंद व्हावेत एवढ्या पुरताच मर्यादित होता. ती विधायक आणि सकारात्मक अशी भूमिका होती. हिंदुधर्म निर्मूलन हे आगरकरीय सुधारणेचे उद्दिष्ट होते असे नाही.

सुधारकाग्रणी आगरकर आणि प्रतिगामी व्यक्तींचा लढा हा हिंदुधर्मांतर्गत आचरणाचा होता. हे आकलन जर यथार्थ असेल तर आगरकरांची सामाजिक सुधारणा आणि अंधश्रद्धानिर्मूलन वाद यांत सलगता, सुसंवाद आहे असे म्हणता येत नाही.

### सुधारणा आणि अंधश्रद्धानिर्मूलन

❑ 'आगरकरीय सुधारणा' आणि अंधश्रद्धा निर्मूलन यामध्ये सलगता किंवा सुसंवाद नाही हे अवलोकन म्हणून मांडले आहे. ती असली पाहिजे असा अभिप्राय नाही.

❑ सर्व विवेकी जनांना विवेकी म्हणून ते मानतील असा आचरणाचा आदेश अजून तरी प्राप्त झाला नाही. या संदर्भात एक वाक्य आठवते ते असे की "अशी गोष्ट नाही की ईश्वराने फक्त द्विपाद मानव प्राणी निर्माण केला आणि त्याला शहाणा करण्याचे काम अरिस्टॉटलवर सोपविले."

❑ ज्याला विवेकाचा आधार नाही ती श्रद्धा असे जर असेल तर सर्वच श्रद्धा अंध असतील. अंधश्रद्धा या शब्द प्रयोगामुळे असे वाटते काही श्रद्धा डोळस असाव्यात. परंतु अंधश्रद्धेची जशी भरपूर उदाहरणे आहेत तशी डोळस श्रद्धेची नाहीत. आपल्या विवेकावर असणाऱ्या आपल्या श्रद्धेला डोळस श्रद्धा म्हणता येईल. पण 'विवेकावर श्रद्धा' हे विपरीत होईल.

❑ अलीकडेच सकाळमध्ये ख्यातनाम शास्त्रज्ञ श्री. जयंत नारळीकर यांनी फलज्योतिषावर एक सुंदर लेख लिहिला आहे. त्यांत त्यांनी एक घडलेला प्रसंग सांगितला आहे. तो असा-जनसामान्यांच्या मुहूर्तविषयक अंधश्रद्धेमुळे त्यांच्या मुलीला हव्या त्या रंगाची हवी ती स्कूटर हवी त्यावेळेस मिळाली. फलज्योतिषावरील त्यांच्या लेखांतील प्रतिपादन एकवेळ लोक विसरतील पण 'स्कूटरची गोष्ट' मात्र विसरणार नाहीत. अंधश्रद्धानिर्मूलनाचा सोपान मार्गच त्यांनी दाखविला असे झाले आणि असे व्हायलाही पाहिजे.

❑ धर्मनिर्मूलन करणे हे मूले कुठारः। असे जरी सकृतदर्शनी वाटले तरी अंधश्रद्धा निर्मूलनावरच ती मूले कुठारः। ठरेल.

❑ कोणत्याही श्रद्धेला विवेकाचा आधार नसतो म्हणून सर्वच्या सर्व श्रद्धा नाकारणे व्यवहार्य किंवा योग्य ठरणार नाही. कोणत्याही श्रद्धेचा नकार किंवा स्वीकार हा त्या श्रद्धेमुळे केलेल्या आचरणाच्या परिणामावरून केला पाहिजे. परिणाम जर अपायकारक असेल तर त्या श्रद्धेचा त्याग केला पाहिजे. निर्मूलन केले पाहिजे. ज्या अपायकारक नसतील, त्यांना त्या केवळ श्रद्धा आहेत म्हणून नाकारणे अयोग्य ठरेल. त्यांच्या स्वीकारास प्रत्यवाय असू नये. त्यांचा स्वीकार मात्र अनिवार्य नाही जसा त्या अपायकारक म्हणून नाकारणे अनिवार्य आहे.

❑ अंधश्रद्धा निर्मूलन किंवा सामाजिक सुधारणा हा सामाजिक-शारीरिक संघर्षाचा विषय बनू नये. तो समाज प्रबोधनाचा वैचारिक विषय आहे व

असावा. सामाजिक सुधारणा ही अविरत संथपणे चालणारी प्रक्रिया आहे.

शनिशिंगणापूर येथे घरांना दरवाजे नाहीत. कारण तिथे चोऱ्या होत नाहीत. कारण तिथे चोरी केली की चोर अंध होतो, अशी (अंध) श्रद्धा आहे. खरोखरीच त्या गावांत अशा श्रद्धेमुळे जर चोऱ्या होत नसतील तर अंधश्रद्धा निर्मूलनवादाप्रमाणे जर त्या अंधश्रद्धेचे निर्मूलन करण्यासाठी चोऱ्या घडवून आणल्या जाव्यात असे असेल, की बघा चोर अंध होत नाहीत याला विवेक म्हणायचे की विवेक भ्रष्टता? कारण एकदा का या अंधश्रद्धेचे निर्मूलन झाले की त्या गावांत चोऱ्या सुरु होणार की नाही? अंधश्रद्धानिर्मूलन अंधश्रद्धा निर्मूलनासाठीच असे आहे की समाज, व्यक्ती सुधारण्यासाठी आहे असे म्हणायचे? राजकारण स्वातंत्र्य उदयापासून बाहुबलींच्या अनियंत्रित, असामाजिक, प्रवृत्तींची जन्मभूमी आणि कर्मभूमी बनत चालली असून आज त्याची परमावधी झाली आहे, त्यावर कळस चढला आहे.

आदर्श नागरिक आदर्श राज्यसंस्थेत जन्माला येतो असे म्हणतात. आपल्याकडे याच सर्वप्रवृत्त, सदाचारी त्यागी, तत्त्वनिष्ठ, समाजसेवकांची राष्ट्रप्रेमींची गच्छंति झाली-सत्ताकेंद्रातून. आणि अशा लोकांना त्यांच्या अनुयायांना अंधश्रद्धा निर्मूलनाचा कायदा करा म्हणून राज्यकर्त्यांकडे याचना करण्याची वेळ आली की (ज्यांचे राज्य अंधश्रद्धावाद्यांच्या मतावर चालले आहे). दैवदुर्विलास असा की भारतीय नेत्यांपैकी काहींकडे महात्मा गांधींचे महात्मापण गेले आणि काहींकडे त्यांचा झाडू आला. अशी या आपल्या देशाची तात्पर्य नसलेली गोष्ट आहे.

टीप :- या लेखात/टिपणात Rationalist association of India यांच्या अंधश्रद्धाबाबतच्या कार्याबद्दल समावेश नसला तरी, त्यामुळे या लेखातील प्रतिपादनाला बाधा पोहचत नाही.











**परीक्षण लेख**

# प्रसार - माध्यमांचे प्रश्नोपनिषद्

प्रा० प्रसन्नकुमार अकलूजकर

प्रा. जयदेव डोळे यांचे 'समाचार अर्थात प्रसार माध्यमांची झाडाझडती' हे पुस्तक लोकवाङ्मय गृह प्रकाशनाने अलीकडेच प्रसिद्ध केले आहे. या पुस्तकात एकूण ३२ लेख आहेत. हे सर्व लेख वृत्तपत्र व अन्य दृक्‌श्राव्य-प्रसार माध्यमांविषयी चर्चा करणारे आहेत. पत्रकारितेचे आजचे बदलते स्वरूप आणि त्या बदलत्या स्वरूपामागची कारणे शोधण्याचा प्रयत्न प्रा. डोळे या लेखनातून करताना दिसतात. ही कारणे शोधताना कधी सूचक तर कधी थेट टीकाटिप्पणी करीत त्यांनी विवेचन केले आहे. हे विवेचन मुख्यतः भाष्यात्मक आहे. शिवाय ते प्रसंगपरत्वे केलेले आहे. माध्यमांचे टीकाकार अशी प्रा. डोळे यांची प्रतिमा आहे. व्यावसायिक पत्रकारिता आणि पत्रकारितेचे अध्यापन या दोन्ही क्षेत्रात गेली पंचवीसहून अधिक वर्षे ते काम करीत आहेत. अनंतराव भालेराव ज्याचे संपादक होते त्या 'मराठवाडा' या वृत्तपत्रात त्यांनी पंधरा वर्षे काम केले. 'मराठवाडा' हे पुण्यामुंबईच्या दैनिक वृत्तपत्रांपेक्षा वेगळे होते. खुद्द भालेराव यांच्या व्यक्तिमत्त्वाची आणि विचारांची छाप त्यावर होती. किंबहुना त्यांच्या विचारसरणीतूनच 'मराठवाडा'ची जडणघडण झाली. 'मराठवाडा' दैनिकाने एक विशिष्ट सामाजिक व राजकीय बांधिलकी मानली होती. वृत्तपत्र ही केवळ उत्पादित वस्तू (कमॉडिटी) नाही ही भूमिका भालेरावांनी घेतली होती. सामान्य माणसाशी आपली बांधिलकी मानणारे भालेराव हे ध्येयवादी पत्रकारितेचा जवळजवळ अखेरचा दुवा होते. हे लिहिण्याचे कारण असे की, 'समाचार'चे लेखक प्रा. डोळे यांचा पिंड या 'मराठवाडा' वृत्तपत्रात घडला आहे. हा काळ राज्यात आणि देशात अनेक राजकीय आणि सामाजिक उलथापालथी घडविणारा होता. त्यामुळे सामाजिक प्रश्नांकडे पाहण्याचा प्रा. डोळे यांचा दृष्टिकोण केवळ पत्रकाराचा नाही. त्यात एक चळवळीतील कार्यकर्ताही दडलेला आहे. समाजवादी विचारांचे संस्कार घरातच झाले. सामाजिक न्यायाच्या भूमिकेतून ज्या चळवळी, संघटना स्थापन झाल्या त्याच्याशी प्रा. डोळे निगडित होते. 'मराठवाडा'त लेखन करताना त्यांच्या विशिष्ट विचारांचे प्रतिबिंब उमटत असे. 'मराठवाडा' दैनिक काळाच्या ओघात व्यावसायिक स्पर्धेत टिकू शकले नाही. ते बंद पडले. ते बंद होण्यापूर्वीच प्रा. डोळे यांनी पत्रकारितेच्या अध्यापनाच्या क्षेत्रात प्रवेश केला. पुणे विद्यापीठाच्या संज्ञापन व वृत्तपत्रविद्या विभागात त्यांनी अधिव्याख्याता म्हणून दहा वर्षे काम केले. सध्या ते डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या वृत्तपत्रविद्या विभागात प्रपाठक म्हणून काम करीत आहेत. हा तपशील देण्याचे कारण म्हणजे आधी पत्रकार आणि आता पत्रकारितेचा शिक्षक असा प्रा. डोळे यांच्या भूमिकेत महत्त्वाचा बदल झाला आहे. 'मराठवाडा'मध्ये काम करताना जातीय-धार्मिक संघटनांना, त्यांच्या विचारसरणीला आणि धर्माधिष्ठित राजकारणाला त्यांनी सतत विरोध केला. (ही विरोधाची धार आजही आहे.) त्यामुळे परखड पत्रकारितेचा वसा त्यांनी तेव्हा कायम ठेवला. आज भूमिका म्हणजे कार्यक्षेत्र बदलले असले तरी 'टीकाकारा'ची भूमिका कायम आहे.

वृत्तपत्रे व प्रसारमाध्यमांमध्ये काम करणारे संपादक, पत्रकार कधी आत्मपरीक्षण करतात का? जगभरातील प्रत्येक बाबीतील दोषावर बोट ठेवणारे आणि 'घणाघाती' वगैरे टीका करणारे संपादक माध्यमातील अपप्रवृत्तींबद्दल बोलतात का? समाजजीवनाची जी वेगवेगळी क्षेत्रे आहेत त्यात वृत्तपत्रे प्रसारमाध्यमे हे पूर्णतः वेगळे क्षेत्र मानले गेले आहे. वृत्तपत्र हे माहिती व विचार देणारे साधन असले तरी माहिती-तंत्रज्ञानाच्या स्फोटानंतर गेल्या दोन शतकात या








साधनाची उद्दिष्टे अधिक विस्तारली आहेत. वृत्तपत्र हा लोकशाहीचा चौथा खांब मानला जातो. हा खांब आज किती भक्कम आहे किंवा किती पोखरला आहे हे पाहण्याचाच प्रा. डोळे यांचा प्रयत्न आहे.

जगावर टीका करणाऱ्या वृत्तपत्रांची समीक्षा कोणी करावयाची? त्या त्या वृत्तपत्रसंस्थेत किंवा प्रसारमाध्यमांमध्ये अशी व्यवस्था असते; परंतु त्रयस्थपणे समीक्षा करण्याची पद्धत नाही. वृत्तपत्रविद्येचे शिक्षण व प्रशिक्षण देणाऱ्या संस्था (इन्स्टिट्यूटस्), विद्यापीठांचे विभाग आणि माध्यमविषयक नियत-कालिके व शोधपत्रिका यातून अशी समीक्षा चालते. प्रसारमाध्यमात प्रवेश करणाऱ्या प्रशिक्षार्थींना यातील बऱ्यावाईटाचे भान निर्माण करण्याची जबाबदारी माध्यम-शिक्षकांवर व माध्यम तज्ज्ञांवर असते. नव्हे, तशी ती असावयास हवी. प्रा. डोळे यांच्या 'समाचार' मधील लेखनामागची मानसिकता हीच आहे. व्यापारी, बाजारू प्रसारमाध्यमांच्या पसाऱ्यात परखड, वैचारिक बांधिलकी मानणारी पत्रकारिता संपुष्टात आली आहे का? आशेचा काहीच किरण नाही का? जे पुढ्यात येते ते अगतिकपणे वाचक-प्रेक्षकाने (खरे तर ग्राहकाने) स्वीकारावयाचे का? माध्यमांमध्ये घडणारे सर्वच बदल नैसर्गिक किंवा अपरिहार्य म्हणून मान्य करावयाचे का? असेच प्रश्न प्रा. डोळे यांच्या पुढे उभे राहिले असावेत. हे प्रश्न कोणते? ते का व कसे निर्माण झाले? माध्यमांपुढचे प्रश्न आणि माध्यमांनी निर्माण केलेले प्रश्न असे हे प्रश्नोपनिषद् आहे. प्रस्तुत पुस्तकातील सहा भागांतील बत्तीस लेखांमधून मांडलेले विषय समजावून घेण्यापूर्वी १९९०/९१ नंतरच्या दशकात वृत्तपत्रे आणि प्रसारमाध्यमे यांमध्ये कोणते महत्त्वाचे ठळक बदल घडले त्याची नोंद घेणे आवश्यक आहे. ते प्रमुख मुद्दे असे :

१) नवे माहिती तंत्रज्ञान आणि भांडवली गुंतवणूक :

'संगणक' नावाची वस्तू आली. गेल्या दीड-दोन दशकांत माहितीचे महाजाल उभे राहिले. मुद्रित माध्यमांकडे असणारी साधने, मनुष्यबळ, यंत्रसामग्री आणि भांडवल मर्यादित होते. राष्ट्रीय पातळीवरील समूह आणि साखळी वृत्तपत्रांची मक्तेदारी होती, ती अर्थातच इंग्रजी वृत्तपत्रांची! भाषिक-वृत्तपत्रांच्या तुलनेत या राष्ट्रीय पातळीवरील इंग्रजी वृत्तपत्रांचे खप, आर्थिक उलाढाल आणि जाहिरातींचे उत्पन्न मोठे होते. किंबहुना राज्य पातळीवरील भाषिक वृत्तपत्रांचे अस्तित्व भांडवली वृत्तपत्रांमुळे झाकोळून गेले होते. ही परिस्थिती केवळ तंत्रज्ञानामुळे बदलली. खुले आर्थिक धोरण आणि जागतिकीकरण हे दोन परवलीचे शब्द झाले आहेत. त्यामुळे भोवतालच्या सर्वच जीवनांगांवर परिणाम घडला आणि घडतो आहे. अर्थात त्याचा बरा वाईट फायदा प्रसारमाध्यमांनाही झाला. माहितीचे मर्यादित स्त्रोत अमर्याद झाले. पूर्वी टेलीप्रिंटर, टेलेक्स, फोन आणि तारा हीच साधने होती. या साधनांमधून येणारे वृत्त किंवा माहिती अधिक वेगाने वाचकांपुढे ठेवण्याची मालक-संपादकांची धडपड असे. धडपड नव्हे, तर कसरतच करावी लागे. लायनो-मोनो ही अक्षर-जुळणीची यंत्रे आणि रोटरी मशिन्स हा वृत्तपत्रे छपाईचा मुख्य आधार होता. संगणकामुळे यात अमूलाग्र बदल झाला. हा चमत्कारच म्हणावयास हवा. संगणकीय अक्षरजुळणी आणि प्रतिरूप (ऑफसेट प्रिंटींग) मुद्रणपद्धती यामुळे वृत्तपत्राचा चेहरामोहराच बदलला. माहितीच्या देवाणघेवाणीचा वेग वाढला. 'दर्पण' काढताना बाळशास्त्री जांभेकरांनी आपल्या पत्राचा उद्देश स्पष्ट करताना 'चालते काळाची वर्तमाने खेळविणे' असे म्हटले होते. चालते काळाचीच नव्हे तर त्या क्षणाची वर्तमाने आज आपल्यापर्यंत येऊन पोहोचतात. नव्या तंत्रज्ञानाचा फायदा छोट्या, मध्यम आणि बड्या अशा तिन्ही गटांतील वृत्तपत्र मालकांना झाला. संगणकामुळे बातमी (वा कोणत्याही प्रकारची माहिती) व छायाचित्रांची देवाणघेवाण विलक्षण वाढली. तिन्ही गटातील मालकांनी आपापल्या परीने आर्थिक गुंतवणूक केली. वृत्तपत्र व्यवसायात मोठी आर्थिक गुंतवणूक आवश्यक असते पण 'खूप पैसे घातले म्हणून वृत्तपत्र चालले' असे होत नाही. अन्य उत्पादनांपेक्षा (प्रॉडक्ट) हे उत्पादन वेगळे आहे. आज दोन अडीच रुपयांना

मिळणाऱ्या वृत्तपत्राचा प्रत्यक्षातील उत्पादन खर्च कितीतरी पट अधिक असतो. उत्पादनखर्चावर आधारित किंमत ठेवावयाची तर ती दहा-बारा रुपयांपर्यंत जाऊन ठेपेल. तसे प्रत्यक्षात घडताना दिसत नाही. किंबहुना १९९० पूर्वी वृत्तपत्रमालकांना पंचवीस पैसे किंमत वाढवितानाही विचार करावा लागे. वृत्तपत्रमालक व त्यांच्या संघटनांच्या बैठका होत. वृत्तपत्रकागदाचा (न्यूजप्रिंट) प्रश्नही बिकट होता. एस.टी.सी. (स्टेट ट्रेडिंग कॉर्पोरेशन) कडून तो घ्यावा लागे. त्याच्या आयातीस विलंब झाला तर 'तुटवडा' भासे. काही बडी वृत्तपत्रे छोट्या-मध्यम गटाच्या वृत्तपत्रांना हा कागद दामदुप्पट भावात विकत असत. या सर्व अडचणी नवे माहिती तंत्रज्ञान (न्यू कम्युनिकेशन टेक्नॉलॉजी) व खुले आर्थिक धोरण यामुळे नष्ट झाल्या. स्पर्धा वाढली पण ती केवळ व्यवसायांतर्गत नव्हे तर दृक्‌श्राव्य माध्यमांशी! मोठ्या आर्थिक गुंतवणुकीतून माध्यमांनी आपापली लहानमोठी साम्राज्ये स्थापण्यास प्रारंभ केला. त्यातून दोन महत्त्वाच्या घटना घडल्या. १) बहु-आवृत्तिकरण आणि २) बहुमाध्यम मालकी.

१) बहु-आवृत्तिकरण : भाषिक म्हणजेच प्रादेशिक वृत्तपत्रांनी १९९० च्या आसपास अन्य ठिकाणी म्हणजे जिल्हा व शहर या ठिकाणी स्वतंत्र आवृत्त्या काढण्यास प्रारंभ केला. बड्या भांडवली इंग्रजी वृत्तपत्रांच्या आवृत्त्या वेगवेगळ्या राज्यांमध्ये होत्याच परंतु ती वृत्तपत्रे समूह (ग्रुप) वा साखळी (चेन) वृत्तपत्रे म्हणूनच ओळखली जात. मराठी वृत्तपत्रांनीही राज्यान्तर्गत शहरागणिक आवृत्त्या सुरु केल्या. पुण्या-मुंबईत वृत्तपत्र छापून ठराविक कालमर्यादेत ते जिल्ह्याच्या ठिकाणी पाठविणे ही यातायात होती. मनुष्यबळ, मर्यादित साधने आणि आर्थिक चणचण यामुळे स्वतंत्र आवृत्त्या प्रकाशित करणे परवडणारे नव्हते. उदाहरण म्हणून 'सकाळ'चे देता येईल. या वृत्तपत्राने प्रथम कोल्हापूर येथे स्वतंत्र आवृत्ती काढली. 'केसरी'ने प्रथम अशा आवृत्तीस विरोध करून जिल्हापत्रांची बाजू घेतली. परंतु त्या पाठोपाठ सोलापूर येथे स्वत:ची आवृत्ती काढली. नव्या तंत्रज्ञानामुळे कमी मनुष्यबळाच्या आधारे स्वतंत्र आवृत्ती काढणे शक्य झाले. हिंदी भाषिक वृत्तपत्रांचा भौगोलिक प्रदेश मोठा असल्यामुळे त्यांनी राज्यवार आवृत्त्या काढल्या असल्यास नवल नाही. (या संदर्भात 'भास्कर' व 'जागरण' या आघाडीच्या वृत्तपत्रांचा उल्लेख इथे करता येईल.) या आवृत्तिकरणामुळे व्याप आणि आर्थिक उलाढाल वाढली परंतु समग्र चित्र उभे करण्यात वृत्तपत्रे कमी पडू लागली व वृत्तपत्रे कप्पेबंद झाली. बहुआवृत्तिकरणाबरोबर माध्यमांचे एकमेकांमध्ये सम्मीलीकरण व रूपांतरण होऊ लागले. 'मीडिया कनव्हर्जन्स' हाही परवलीचा शब्द बनला. रेडिओ, टीव्ही आणि इंटरनेट या माध्यमांमध्येही वृत्तपत्रे शिरली. बहुविध-माध्यम मालकी अस्तित्वात आली. बड्या इंग्रजी वृत्तपत्राच्या मालकांचे पूर्वी अनेक उद्योग होते व आहेतही. वृत्तपत्र हा त्यातला कमी नफ्याचा परंतु 'सत्ता' म्हणून महत्त्वाचा उद्योग होता. भाषिक वृत्तपत्रांनीदेखील आता रेडिओ व टीव्ही या माध्यमांत गुंतवणूक केली आहे.

बहुआवृत्तिकरण व बहुमाध्यम मालकी यामुळे प्रसारमाध्यमांमधील स्पर्धेने टोक गाठले आहे. आपला लक्ष्य वाचकगट वा लक्ष्य प्रेक्षकगट (टार्गेट ऑडियन्स) टिकवून ठेवण्यासाठी वृत्तपत्रांना आपला चेहरामोहराच बदलणे भाग पडले आहे. रीडरशिप सर्व्हे आणि टी.आर.पी. च्या स्पर्धेत घडत असलेले बदल किती उचित, किती अनुचित? माध्यमांचा मूळ हेतूच या स्पर्धेत मागे पडत नाही ना? यासारखे प्रश्न प्रा. डोळे यांच्या लेखांमधून चर्चिले गेले आहेत. वृत्तपत्र हे टूथपेस्ट, साबण, शाम्पू, यासारखेच उत्पादन आहे का? वास्तविक ते तसे नाही, परंतु प्रसारमाध्यमांमधील विपणकर्ते त्याकडे 'प्रॉडक्ट' म्हणून पाहतात आणि वाचक प्रेक्षकाकडे 'कन्झ्युमर' म्हणून! या बदलात 'हार्ड न्यूज' व 'सॉफ्ट न्यूज'च्या संकल्पना बदलल्या. 'नॉन न्यूज' हीच 'न्यूज' होऊ लागली. बातमीचे वस्तूकरण (कमॉडिफिकेशन ऑफ न्यूज) आणि बाजारीकरण झाले. 'विक्रीयोग्य वस्तू' बनल्यानंतर बातमीचे मूल्य, महत्त्व घसरत गेले आणि आज 'बातमीचे किंवा

अनुक्रमणिका








माहितीचे क्षुल्लकीकरण' (ट्रिव्हिलायझेशन ऑफ न्यूज) झाले. वृत्तपत्रांचे 'रकाने' (जाहिरातींचे वगळून) आणि चित्रवाहिन्यांचे 'स्लॉट' बातमी नसणाऱ्या माहितीने भरू लागले. वृत्तपत्रांना समव्यावसायिकांबरोबर चित्रवाहिन्या व वृत्तचित्रवाहिन्यांशी स्पर्धा करावी लागते आहे. ही स्पर्धा जीवघेणी आहे. त्यामुळे एका बाजूला वृत्तचित्र-वाहिन्यांशी स्पर्धा तर दुसरीकडे वृत्तचित्रवाहिन्यांपेक्षा वेगळी, पृथगात्म माहिती देण्याचा अट्टाहास अशा कात्रीत वृत्तपत्रकार सापडले आहेत. त्यामुळे काही वृत्तपत्रे वृत्तचित्रवाहिन्यांबरोबर फरफटत जाताना दिसत आहेत. यावरील उपाय म्हणून काही वृत्तपत्रेच चॅनेल्सच्या व्यवसायात उतरली आहेत. रेडिओच्या एफ.एम. वाहिन्यांदेखील बहुमाध्यम मालकीचाच प्रकार आहेत. या साऱ्या पसाऱ्यात मुद्रित माध्यमाचे भवितव्य काय?

पहिल्या भागात प्रा. डोळे यांचे वृत्तपत्रांविषयीचे लेखन आहे. हे लेखन साप्ताहिके, नियतकालिके, दिवाळी अंक यातून प्रसंगपरत्वे घडत गेले आहे. त्या त्या वेळची ही लेखनप्रक्रिया असली तरी त्यामागे एक सूत्र आहे. साऱ्या जगावर भाष्य करणाऱ्या माध्यमांवर कोण भाष्य करणार? साहित्यकलादी प्रकारांची चिकित्सा होते. टीकाटिप्पणी होते मग माध्यमांनाच का वगळावयाचे? या विचारातूनच प्रा. डोळे लिहितात. या लेखांची एक गंमत आहे. खुद्द वृत्तपत्रीय लेखनाला तात्कालिकतेच्या ज्या मर्यादा असतात त्या प्रा. डोळे यांच्या लेखनालाही आहेत. गेल्या दशकभरातील प्रसारमाध्यमांविषयीचे एक समग्र, सैद्धान्तिक चित्र यातून उभे राहाते का? यातील सर्वच मीमांसा ग्राह्य आहे का? माझ्या दृष्टीने प्रा. डोळे यांची मांडणी चपखल आहे. वस्तुस्थितीचे विवेचन सत्याधारित आहे. त्यांच्या टीकेचा रोख पत्रकारितेतील बदलत्या प्रवृत्तींना अनुसरून आहे. वृत्तपत्रे आणि प्रसारमाध्यमे आजच्या सांस्कृतिक पर्यावरणाचाच एक भाग आहेत. त्यामुळे वर्तमानपत्रातले 'वर्तमान' हरवले असल्यास नवल नाही. एवढेच नव्हे तर 'संपादक' नावाच्या व्यक्तीची गरजच नसल्याचे मालकांचे मत असल्यास आश्चर्य वाटावयास नको! यासंदर्भातील 'एंड ऑफ एडिटर' हा लेख महत्त्वाचा आहे. वृत्तपत्र हा एक उद्योग (इंडस्ट्री) होता आणि आहे. आज त्याचे स्वरूप 'कॉर्पोरेट'सारखे झाले आहे. एखाद्या उद्योगसमूहात हजारो कामगार आणि व्हाइट कॉलर अधिकारी एकाच वेळी काम करीत असतात. प्रत्येकाचा परस्पराशी संबंध येतोच असे नाही. प्रत्येकाचे विभाग, पदे, कामाच्या पाळ्या, दर्जा भिन्न भिन्न असतो. 'अ'च्या जागी 'ब' आला तरी उत्पादनात फरक पडत नाही. उत्पादनाची अव्याहत प्रक्रिया चालूच असते. तसेच वृत्तपत्रात घडते आहे. 'दर्पण'पासूनचा मराठी वृत्तपत्रांचा इतिहास पाहिला तर संपादकाच्या नावाने ते पत्र ओळखले जाई. त्या त्या संपादकाचे व्यक्तिमत्त्व, विचारसरणी, भूमिका, शैली, भाषा यांचा त्या त्या वृत्तपत्रावर 'अपरिहार्य' असा ठसा उमटत असे. राजकीय-सामाजिक चळवळींच्या काळात तर अशा संपादकांचे वेगळेपण त्यांच्या लेखनातून उठून दिसत असे. त्या त्या वृत्तपत्राच्या जडणघडणीत दिशा देण्यात त्या त्या संपादकाची मोठीच कामगिरी (काँट्रिब्यूशन) असे. इंग्रजीतही अशी परंपरा होती. मात्र राजकीय नेत्यांनी वृत्तपत्र उद्योगात, प्रवेश केल्यावर अशी 'भूमिका' घेणारे संपादक मालकांच्या दृष्टीने अडचणीचे होऊ लागले. वृत्तपत्रावर संपादकीय विभागाचा आणि त्या विभागाचे नेतृत्व करणाऱ्या संपादकाची पकड असे. आर्थिक हितसंबंध व राजकीय नात्यागोत्यामुळे 'चेहराहीन संपादक' पदरी असणे मालक संचालकांना आवश्यक वाटू लागले. संपादकांचे 'मॅनेजर', 'इव्हेंट को ऑर्डिनेटर' 'कॅटेंट डेव्हलपर' करण्याच्या प्रक्रियेत 'संपादका'चे अस्तित्वच नाकारले जाते आहे. यावर बोट ठेवताना प्रा. डोळे यांनी केलेली मीमांसा पाहण्यासारखी आहे. त्यांचा रोख नेमका कोणाकडे आहे हे जाणत्यांच्या लक्षात येईलच. ते म्हणतात, "…. जुने सर्व संपादक या गुणसमुच्चयाचे वाहक होते. खेरीज सार्वजनिक जीवनातील वावर, सामाजिक समस्यांची जाण, लोकमानसाची नेमकी जाण व वाचकांच्या बुद्धीशी इमान या बाबी तर संपादकाकडे हव्याच हव्या. एखाद्या संपादकाची तुटक, लोकविन्मुखतेची वृत्ती आणि पढतपांडित्य काढून

सर्वांना त्याच मोजपट्टीने जोखण्याचे खरे तर काम नाही. एकांतप्रिय व आत्ममग्न संपादक ही मराठी वृत्तपत्रसृष्टीतली रीतीभ्रष्टता आहे, ती परंपरा नाही की सार्वत्रिक अनुभव नाही. एंड ऑफ एडिटर व्हायचाच असेल, तर अशा समाजविन्मुख आणि घुम्या, तुसड्या संपादकांचा व्हावा. 'एंड ऑफ एडिटर' अशा एकांड्या, व ओझेवाहू संपादकाचाच झाला आहे हे आज विस्मृतीत गेलेल्या अनेक संपादकांकडे पाहून म्हणता येते."

या विवेचनात काही मुद्दे प्रा. डोळे यांनी दुर्लक्षिले आहेत. ते म्हणतात तसा सर्वगुणसंपन्न, आदर्श संपादक आज अभावानेच आढळेल. शिवाय 'लिहिता संपादक' ही कल्पनाच इतिहास जमा होते आहे. 'वृत्तपत्रात कोण अग्रलेख लिहितो' या बाबीला फारसे महत्त्व राहिलेले नाही. मालकांची धोरणे व हितसंबंध सांभाळणारा किंवा त्यांच्या आड न येणारा किंवा त्यांच्याशी निगडित विषय टाळून लिहिणारा पत्रकार संपादक म्हणून हवा असतो. खुद्द प्रा. डोळे यांनीच या लेखात म्हटल्याप्रमाणे पदे वाटेल तेवढी निर्माण करता येतात. नावामागे बिरुदे चिकटविता येतात. सुखवस्तू म्हणून जगता येईल अशी आकर्षक 'पॅकेजेस्'ही देता येतात (किंवा दिली जातात !) याचे कारण केवळ त्याची गुणवत्ता असे असत नाही. माध्यमांच्या फुटलेल्या बाजारपेठेत प्रशिक्षार्थी पत्रकारापासून ते थेट निवासी, कार्यकारी संपादकापर्यंतच्या नेमणुका आणि त्यांचे वेतनाचे 'पॅकेज' कसे ठरवितात याच्या वास्तवतेकडेही ध्यान दिले पाहिजे. स्वातंत्र्यपूर्व काळात संपादकाच्या नावानेच वृत्तपत्र ओळखले जाई. मालकच संपादक असत. बहुतेक संपादक राजकीय वा सामाजिक परिवर्तनाच्या चळवळीशी संबंधित होते. स्वातंत्र्योत्तर काळात परिवर्तनाचे प्रयोजन पूर्णतः संपले नाही; परंतु, व्यावसायिक पत्रकारितेला प्रारंभ झाला. स्वातंत्र्योत्तर काळातील काही चळवळींमध्ये काही संपादक सहभागी झाले. आपले वृत्तपत्र चळवळीचे मुखपत्र बनवले. हा इतिहास झाला तरी त्यातला तथ्यांश लक्षात घेता समाजसंमुखतेचा मुद्दा पुढे येतो. याचा अर्थ चळवळींशी संबंध ठेवणारे संपादक असतील तरच 'एंड ऑफ एडिटर'च्या संकल्पनेला छेद जाऊ शकतो असे नाही. 'ज्ञानप्रकाश'चे संपादक कृ. ग. तथा काकासाहेब लिमये पुण्याच्या राजकीय व सामाजिक जीवनाशी निगडित होते. मात्र सभा संमेलने, महोत्सव अशा सार्वजनिक कार्यक्रमांना ते सहसा उपस्थित राहात नसत. 'संपादक अंकात दिसावा, अंकातील छायाचित्रात दिसू नये' असे लिमये यांचे धोरण होते. (हेच धोरण स्वातंत्र्योत्तर काळात 'महाराष्ट्र टाइम्स'चे संपादक गोविंद तळवलकर यांनी अंगीकारले होते.) संपादक असल्यामुळे लिमये यांच्या कार्यालयात व घरी मातब्बर पुढाऱ्यांपासून 'प्रभात'चा चित्रपटकलावंत, गायक यांच्यापर्यंत अनेकांचा राबता असे. याचा अर्थ लिमये समाजविन्मुख तर नव्हतेच पण 'हस्तिदंती मनोरा' आणि 'सार्वजनिक जीवन' यातील सीमारेषा त्यांना उत्तम ठाऊक होत्या. त्यामुळेच तत्कालीन 'भाला' या पत्राचे संपादक भोपटकर यांनी 'हा संपादक काळा आहे की गोरा' हे देखील आम्ही पाहिलेले नाही' असा खोचक शेरा मारला होता. संपादक क्रियाशील कार्यकर्ता झाला की आपोआपच त्याला विशिष्ट बाजू घ्यावी लागते. हे टाळण्यासाठी त्याने समाजाभिमुख किती राहावयाचे हे स्वतःच ठरविले पाहिजे.

प्रा. डोळे यांनी 'एंड ऑफ एडिटर'मध्ये त्यांच्या परीने विश्लेषण केले असले तरी आजच्या संपादकाचे स्थान नेमके काय राहिले आहे याची त्यांनी अधिक मीमांसा करायला हवी होती. आजच्या बऱ्याच संपादकांची प्रतिमा, 'समारंभातून मिरविणारे आणि छायाचित्रात दिसणारे' अशी झाली आहे. त्यांचे स्वातंत्र्य, त्याचे अधिकार, वृत्तदात्यावरील त्यांचे नियंत्रण यांचा संकोच होत चालला आहे. 'आपली बातमी व छायाचित्र यावे' या एकच उद्देशाने सार्वजनिक संस्था, प्रकाशक, स्वयंसेवी संस्था व त्यांचे पदाधिकारी वृत्तपत्राच्या संपादकांना निमंत्रित करतात. अध्यक्ष, उद्घाटक, प्रमुख पाहुणे यापैकी एका खुर्चीवर संपादक विराजमान होतो. संपादकच या कार्यक्रमाच्या अग्रभागी असल्यामुळे दुसऱ्या दिवशी बातमीचे 'लीड' ही त्यांच्याच वक्तव्याचे होतात. शिवाय अन्य महनीय, व्यक्तींच्या समवेत

छायाचित्रेही प्रसिद्ध होतात. वृत्तपत्रातील 'स्थानिक' कार्यक्रमांचा स्तंभ पाहिला तरीही या प्रकारची कल्पना येईल.

हे सर्व का घडते आहे? राजकीय हितसंबंध वा मालकाचे हितसंबंध नसणाऱ्या विषयांबाबत, प्रश्नांबाबतही परखड भूमिका घेताना संपादक दिसत नाहीत. 'सेल्फ सेन्सॉरशिप' सारखाच हा प्रकार आहे. लेखनातून पत्रकार/संपादक ओळखला जावा, त्याची निजखूण (आयडेंटिटी) सिद्ध व्हावी ही अपेक्षा असते. वृत्तपत्रांचे 'कॉर्पोरेटायझेशन' झाल्यामुळेच ही अवस्था आली आहे. निळी कॉलर, लाल सलाम, पांढरे निशाण, रंगीत दुकान' या आकर्षक मथळ्याच्या लेखात प्रा. डोळे यांनी आजच्या वृत्तपत्रांचे वास्तव, भेदक दर्शन घडविले आहे. संपादक मालक संबंधांची चर्चा या लेखात आहे. लेखातील अनेक संदर्भ तात्कालिक आहेत. 'माहितीची बाजारपेठ' फुटली तर त्याचे लाभ जिल्हापत्रापासून साखळी/समूह वृत्तपत्रांपर्यंत सर्वच घेणार! उत्तम छपाई, सुरेख मांडणी, रंगीत छायाचित्रे, हलका फुलका मजकूर आणि कमी किंमत (स्वागतमूल्य वगैरे) असा दावा आहे. यालाच वृत्तपत्रविद्येत 'कम्युनिकेशन पॅकेज़' म्हणतात. आज बाजारपेठेत ब्रँडेड आणि नॉन ब्रँडेड दोन्ही उत्पादने खपतात. वरकरणी ती उत्तमच दिसतात. प्रत्येकाला आपला असा ग्राहकवर्ग आहे स्पर्धा आहे पण स्पर्धेत टिकून राहण्याचे मार्गही ज्याने त्याने काढले आहेत. या स्पर्धेतच उपसंपादक-वार्ताहरांनाही आपले कौशल्य सिद्ध करावे लागते. मात्र त्याचीही अवस्था 'माहिती-कामगारा' (नॉलेज़ वर्कर) सारखी झाली आहे. अखंड प्रक्रिया असणाऱ्या उद्योगात किंवा कारखान्यांमध्ये कामगारापासून ते अभियंत्यापर्यंत जी उतरंड असते त्या पद्धतीनेच वृत्तपत्र-उद्योग काम करतो आहे. प्रत्यक्ष कामगार आणि पत्रकार यांच्यातील नातेही आता संपुष्टात आले आहे. त्यामुळे संप, आंदोलन, धरणे हे इतिहासजमा झाले आहे. अर्थात तेवढे एकच कारण नाही. 'कंत्राटी पद्धतीचा उदय' हे महत्त्वाचे कारण आहे. श्रमिक पत्रकार संघटना 'ट्रेड युनियन' म्हणून अस्तित्वात आल्या. केंद्र शासन ठरावीक काळानंतर पत्रकार व पत्रकारेतर कर्मचाऱ्यांसाठी वेतन आयोगाची नियुक्ती करते. या आयोगाच्या शिफारशी वृत्तपत्रमालकांनी अमलात आणाव्यात अशी अपेक्षा असते. गेल्या काही आयोगांचा अनुभव पाहता मालकमंडळी या शिफारशी कार्यान्वित करण्यास फारशा राजी नसतात. त्याऐवजी आकर्षक 'सॅलरी पॅकेज' देऊ केले जाते. अर्थात ते करार पद्धतीनेच! त्यामुळे विशिष्ट वृत्तपत्राशी असणारी बांधिलकी वा निष्ठा हे शब्द फिजूल ठरले आहेत. मध्यंतरी मराठी वृत्तपत्रांत संपादकांचा 'संगीतखुर्ची'चा खेळ रंगला होता. हा खेळ आता प्राधान्याने इंग्रजी वृत्तपत्रांमध्ये व वृत्तवाहिन्यांमध्ये चालू आहे.

याच संदर्भात परदेशी गुंतवणुकीचा प्रश्नही प्रा. डोळे यांनी मांडला आहे. एकीकडे भांडवलदारांना, मालकांना, राजकीय पक्षाशी निगडित मालक संपादकांना विरोध करणारे प्रा. डोळे 'परदेशी भांडवल स्वागतार्ह' असल्याचे समर्थन करतात, आणि वर्गीय हितसंबंध लक्षात घेऊन एकजुटीचा 'संदेश' ही देतात. वृत्तपत्रांचे मालक हे आपले 'शत्रू'च आहेत अशी ठाम धारणा मनी बाळगून केलेले हे लेखन काही ठिकाणी एकांगी, एकतर्फी वाटते. 'फास्ट फूड' आणि 'वृत्तपत्रे' यांची तुलना वरकरणी आकर्षक वाटते. फास्टफूडचे खाद्यपदार्थ जसे निःसत्त्व तशीच आजची वृत्तपत्रे निःसत्त्व झाली आहेत, असा प्रा. डोळे यांच्या विवेचनाचा मतितार्थ आहे. 'बदलता महाराष्ट्र' या ग्रंथासाठी मुळात लिहिलेला हा लेख पत्रकारितेच्या आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक अंगांचे विवरण करतो. त्यातील संपादक, मालक यांच्या नावांचे थेट उल्लेख करण्याची गरज आहे का? सामान्य वाचकाने एखादे वृत्तपत्र हातात घेतले की त्याला ते कोणाचे आहे हे पक्के ठाऊक असते.

आवृत्तिकरणाबद्दल परीक्षणाच्या प्रारंभीच उल्लेख केला आहे. 'जागतिकीकरण' व 'वैश्विक खेडे' या शब्दांचा जप करत असतानाच आपण अधिकाधिक स्थानिकीकरणाकडे जात आहोत. 'मार्केटिंगचा एरिया' समोर ठेवून विपणन करणाऱ्या व्यवस्थापन विभागाचे

प्रत्यक्षाप्रत्यक्ष दडपण येतेच. हे दडपण कप्पेबंद बातम्या द्यावयास प्रवृत्त करते. काही मराठी वृत्तपत्रे आपणास 'राज्य पातळी'चे स्थान असल्याचा दावा करतात. पण त्यात 'राज्या'चे असे कितीसे प्रतिबिंब उमटते? अन्य जिल्हा आवृत्त्यांच्या बातम्या स्थानिक शहर आवृत्तीत येत नाहीत. ती जागा त्या शहराच्या बातम्यांसाठी किंवा जाहिरातींसाठी वापरली जाते. नाटक चित्रपटाच्या करमणुकीच्या जाहिराती पूर्वी नगर, सातारा आवृत्तीत छापत असत. त्याचा फायदा कलावंत, निर्माते व वाचक यांना होत असे. आता या जाहिराती फक्त शहर म्हणजे पुणे आवृत्तीतच प्रसिद्ध होतात. एवढे कशाला पिंपरी, चिंचवड, खडकी या पुण्याच्या उपनगरात काय चालले आहे याचा पुण्याच्या वाचकांना थांग नसतो. उपनगर आणि जिल्हा अशा दोन स्वतंत्र आवृत्त्या निघतात. उद्या कदाचित, सदाशिव, शनिवार, नारायण पेठ अशा आवृत्त्या निघतील! 'डेक्कन' जिमखाना, औंध, पाषाण अशी उच्चभ्रूंची आवृत्तीही काढावयास हरकत नाही! नाही तरी पुण्यातील इंग्रजी वृत्तपत्रे डेक्कन जिमखाना, भांडारकर रोड अशा तिथिरेषा (डेटलाईन) देतातच! स्थानिकीकरणाचा हा मुद्दा प्रा. डोळे यांनी त्यांच्या लघुशोध प्रबंधामध्ये तपशिलवार अभ्यासला आहे. अर्थात या मुद्याला बगल देता येऊ शकते. कोथरुडच्या वाचकांना आपल्या परिसरातील बातम्या महत्त्वाच्या की मराठवाडा, विदर्भातील? याशिवाय एक मुद्दा उपस्थित केला जातो तो असा की, विदर्भ, मराठवाडा, कोकण आणि पश्चिम महाराष्ट्रातील कित्येकजण शिक्षण-नोकरीच्या निमित्ताने पुण्या-मुंबईत येऊन येथेच स्थायिक झाले आहेत. ही नव्याने स्थलांतरित होऊन इथेच स्थायिक होणारी मंडळी आता 'गड्या आपुला गाव बरा' असे कदाचित म्हणत नसतील परंतु त्या त्या वाचक समूहाला आपापल्या प्रदेशातील वृत्त हवे असते. इथे अजेंडा सेटिंगचा मुद्दा येतो. दैनिक वृत्तपत्रात काय प्रसिद्ध व्हावे किंवा काय होऊ नये याची निश्चिती व्यवस्थापनच काही वेळा करताना दिसते. त्यामुळे कोथरुड परिसराशी निगडित नगण्य बातमी किंवा 'सॉफ्ट न्यूज' ताज्या, हार्ड न्यूजचे स्वरूप घेऊन येते. त्यामुळे आवृत्तिकरण आणि स्थानिकीकरण (लोकलायझेशन) अपरिहार्य आहे. पुण्यामुंबईच्या शहरी पांढरपेशा वाचकांना जिल्हा-तालुका स्तरावर काय चालू आहे यात खरेच रस असेल का हा प्रश्न मुद्दाम प्रा. डोळे यांना विचारावासा वाटतो.

वृत्तपत्रांचे अर्थकारण कसे बदलते आहे याचा ओझरता उल्लेख सुरुवातीला केला आहे. बहुमाध्यम मालकी व बहुविध आवृत्त्या या त्या अर्थकारणाचाच भाग आहेत. दहादहा, तेरातेरा आवृत्त्या प्रकाशित करणारी मराठी वृत्तपत्रे तोट्यात आहेत असे कोणी म्हणणार नाही. काही मराठी पत्रे बंद पडली पण ती प्रामुख्याने विशिष्ट राजकीय पक्ष व विचारसरणीशी बांधिलकी सांगणारी होती. शिवाय राजकीय पक्षांचे ट्रस्ट चालविणे आणि पक्षाचे मुखपत्र (वा वृत्तपत्र) चालविणे यात भल्याभल्यांची गल्लत झाली. आर्थिक उदारीकरणाच्या वाऱ्याला ही पत्रे टिकली नाहीत. जी टिकली त्यांना बदलणे भाग पडले. दैनिक वृत्तपत्रे व चित्रवाहिन्या यांच्या अर्थकारणाचे काही धागेदोरे उकलण्याचा प्रयत्न प्रा. डोळे यांनी 'प्रसारमाध्यमांचे अर्थकारण' या लेखात केला आहे. दोन्ही माध्यमप्रकारांचे अर्थकारण किती व कसे भिन्न आहे हे ते समजावून सांगतात. काही कोटी आणि काही हजार कोटी असे या गुंतवणुकीचे गणित आहे. ही तफावतच मोठी आहे. 'मीडिया' या शब्दाचे सध्या ग्लॅमर आहे. वृत्तपत्रे आणि त्यात काम करणारे पत्रकार, संपादक कितीही बुद्धिमान, विद्वान आणि शैलीदार लेखन करणारे असले तरी चित्रवाहिन्यांमधील पत्रकार, अँकर, न्यूज रीडर यांना आज जी प्रतिष्ठा, लोकप्रियता आहे ती मुद्रित माध्यमांतील पत्रकारांना नाही ही वस्तुस्थिती आहे. दृक-श्राव्य माध्यम मुद्रितमाध्यमांपेक्षा अधिक प्रभावी आहे, वेगवान आहे. हे खरे असले तरी वृत्तपत्रांची विश्वासार्हता व उपयोगिता कमी झालेली नाही. फिल्डमध्ये वार्तांकन करणाऱ्या वृत्तपत्राच्या बातमीदारापेक्षा वृत्तवाहिन्यांच्या पत्रकारांना किती व कसे वलय व लोकप्रियता लाभते याची उदाहरणे देण्याची गरज नाही. प्रणय रॉय, राजदीप सरदेसाई, विनोद दुआ आणि बरखा दत्त ही राष्ट्रीय पातळीवरील नावे पुरेशी आहेत.

व्यापारीकरणामुळे वृत्तपत्रे व वृत्तवाहिन्या या दोहोंमध्ये बदल झाला, कार्यक्रमांचे स्वरूप, त्यांचा आशय, त्याचे सादरीकरण या दृष्टीने एक दिखाऊ चटपटीतपणा आला. याकडे प्रा. डोळे लक्ष वेधतात. इथे पुन्हा प्रा. डोळे यांच्या विचारसरणीचे दर्शन घडते. समाजातील वंचित, नाहीरे गटाला या माध्यमात फारसे स्थान नाही. किंबहुना अलीकडे ते वृत्तपत्रांतही नसते. शेतकऱ्यांच्या आत्महत्या किंवा कुपोषणाचे बळी ही दोन्ही माध्यमाच्या दृष्टीने 'न्यूज'च आहे पण तिचे सादरीकरण केव्हा, कसे आणि किती करावयाचे याबद्दल भांडवलदार मालकांच्या निश्चित अशा सूचना असतात. वृत्तचित्रवाहिन्या एरवीच्या गुन्हेगारीच्या बातम्या संपल्या की, 'प्रश्नां'कडे वळतात. इथेही 'कमॉडिफिकेशन ऑफ न्यूज' हाच मुद्दा असतो. खून, बलात्कार, अपहरण, अपघात, नैसर्गिक व मानवनिर्मित आपत्ती याकडे वृत्तवाहिन्या 'सेलेबल कमॉडिटी' म्हणून पाहतात. वृत्तवाहिन्या व चित्रवाहिन्या आपापला टी.आर.पी. टिकावा म्हणून काहीही करू शकतात. संजय दत्तचा खटला, राजधानी दिल्लीत घडणारे उच्चभ्रूंमधील गुन्हे (हाय प्रोफाइल क्राइम) या घटनांच्या बातम्यांचे चित्रीकरण व सादरीकरण करताना किती व कसा अतिरेक केला जातो हे सांगण्याची गरज नाही. व्यापारीकरण व प्रायोजकांच्या जाहिराती यांचा परस्परसंबंध प्रा. डोळे स्पष्ट करतात.

पहिल्या विभागातील अन्य लेख वृत्तपत्राशी निगडितच आहेत. पहिली एकशेचार पाने प्राधान्याने मुद्रित माध्यमाविषयी विवेचन करणारी आहेत. खुद्द लेखकाने उमेदवारीच्या काळातील आपली पत्रकार म्हणून कशी जडणघडण झाली याचे वर्णन केले आहे. हे लेखन आत्मपर असे आहे. त्यातही स्मरणरमणीयता आहे. 'नियतकालिकांच्या संस्कृती'चा काळ त्यातून उभा राहातो. अन्य पाच भागांमध्ये 'टीव्ही व इलेक्ट्रॉनिक पत्रकारिता', 'भाषा, साहित्य व पत्रकारिता', 'धर्म', 'नवे शतक' व 'महिला पत्रकारिता' यांचा समावेश आहे.

रंजकता हा प्रा. डोळे यांच्या लेखनाचा एक महत्त्वाचा गुण आहे. वाचकांशी संवाद साधत, समकालीन उदाहरणे व दाखले देत ते लिहितात. वृत्तपत्रात दीर्घकाळ काम केले असल्यामुळे चक्र चपखल मथळे देण्यात त्यांचा हातखंडा आहे. माध्यमांएवढेच माध्यमाविषयीचे लेखनही केवळ प्रौढ, गंभीर आव आणणारे असू नये. या हेतूने त्यांनी जाणीवपूर्वक ही शैली स्वीकारली आहे. निरीक्षणे व माहितीच्या बरोबर टीकाटिप्पणी, विश्लेषण असले तरी त्याचा बाज सैद्धान्तिक किंवा शोधलेखाचा नाही. त्यातील संदर्भ हे त्यांच्या वाचनातून, माहितीतून आले आहेत. त्यामुळे तळटीपा, संदर्भयादी त्यात नाही. संज्ञापन व वृत्तपत्रविद्येत काही सिद्धान्त मांडले जातात. हे सिद्धान्त प्रा. डोळे यांना अध्यापनाच्या निमित्ताने परिचयाचे आहेत. मात्र प्रस्तुत संग्रहातील लेखन, अनुभव, निरीक्षण आणि व्यक्तिगत मते यावर प्रामुख्याने आधारित असल्यामुळे त्यात सैद्धान्तिक मांडणीचा भाग फारसा येत नाही. 'थोडेसे पौष्टिक व बरेचसे अरबट-चरबट' या लेखातील प्रा. डोळे यांची निरीक्षणे व भाष्ये मार्मिक आहेत. टीव्हीच्या कार्यक्रमाच्या आकृतिबंध आणि त्याचे सादरीकरण याबद्दल लिहिताना या माध्यमातील उणिवा ते नेमकेपणाने दाखवतात. टीव्हीच्या प्रसारामुळे मनोरंजनाचे एक साधन (ज्यात क्रीडा, पर्यटन, पाककला इत्यादी प्रकारांचा समावेश होतो) घराघरात उपलब्ध झाले. या माध्यमाचा आवाका, पोहोच, वैविध्य सारेच मुद्रितमाध्यमांपेक्षा वेगळे आहे. टीव्ही हा वृत्तपत्राच्या तुलनेत अजून बाल्यावस्थेत आहे. त्यामुळे त्याची ताकद समजावून घेऊ शकणारा समाज निर्माण व्हावयाचा आहे. प्रगत देशांत टीव्ही येऊन बरीच दशके लोटली; पण तेथे अन्य कलांचा लोप झाला व त्यांची पीछेहाट झाली असे नाही. टीव्ही हा मास मीडिया आहे. जनसंज्ञापनाचे ते माध्यम आहे. यातील 'जन' शब्द व्यापक आहे. उच्च शिक्षित, सधनवर्गापासून निरक्षर कष्टकरीवर्गापर्यंत या माध्यमाचा प्रसार झाला आहे. त्याचे बरेवाईट परिणाम आणि त्याचे गुणावगुण यांची सविस्तर चर्चा प्रा. डोळे या लेखात करतात. त्यांच्या निरीक्षणात्मक भाष्यातील काही मुद्दे असे :

१. "ज्यांच्या घरी नोकर-चाकर नव्हते किंवा

ते ठेवण्याची ऐपत नव्हती, त्यांना हा मनोरंजनाचा नवा नोकर सापडला. सदैव दिमतीला तयार आणि वैशिष्ट्यपूर्ण, ऐषारामाचे नवे प्रतीक किंवा घरी शिकवणुकीला येणाऱ्या मास्तरासारखी प्रतिष्ठा देणारा फक्त आणि फक्त त्या घरापुरताच बोलणारा." (पान १०८).

२. "…. अर्थात जनसंज्ञापनाचे माध्यम म्हणून टीव्ही प्रस्थापित झाला. हेच एक माध्यम असे आहे जे नेहमी शिव्या खात असते. आधुनिक समाजातील अनेक दोषांचे जनकत्व अथवा फैलाव त्याच्या माथी मारला जातो. ते 'मासेस'साठी म्हणजे जनतेसाठी असले तरी जनतेमधील प्रत्येक व्यक्ती वेगळी काढून तिला लक्ष्य करण्यासाठीदेखील असते. म्हणजे कोणत्या समाजात आत्मकेंद्रितपणा, व्यक्तिवाद वाढतो आहे किंवा वाढला आहे हे त्या समाजात खोलवर व लांबरुंद पसरलेल्या टीव्हीवरून कळते. जितका मोठा टीव्हीचा प्रसार तितका मोठा — समाजातील व्यक्तिवाद, असे ढोबळ समीकरण आपल्याला करता येईल." (पृष्ठ १०९)

उदाहरण म्हणून येथे प्रा. डोळे यांच्या लेखातील दोन अवतरणे दिली. प्रस्तुत लेख २००० साली 'बेळगाव तरुण भारत'च्या दिवाळी अंकामध्ये प्रकाशित झाला होता. प्रा. डोळे यांची ही टीव्ही या माध्यमाबद्दलची समाजशास्त्रीय मीमांसा म्हणता येईल. या प्रकारची निरीक्षणे जगभर चालणाऱ्या पाहण्यां (सर्व्हे)मधून पुढे आलेली आहेत. आठ वर्षात या माध्यमात आणि माध्यमाच्या प्रसारात व प्रभावात खूप बदल झाला आहे. त्यामुळे ही निरीक्षणे-विशेषतः पहिले निरीक्षण-किती ग्राह्य धरायची तं ठरवता येईल. रेडिओ, टीव्ही, फ्रीज, वॉशिंगमशिन, स्वयंचलित दुचाकी व चारचाकी गाड्या या सर्व गोष्टी एकेकाळी प्रतिष्ठेच्या, समृद्धीच्या प्रतीक मानल्या जात. दोन हजार साली जेव्हा प्रा. डोळे यांनी लेख लिहिला तेव्हा टीव्ही ही अपूर्वाइची बाब नक्कीच नव्हती. कम्युनिटी टीव्ही संटपासून घराघरात किंवा झोपडपट्टीत राहाणाऱ्याकडेही टीव्हीचा सेट येईपर्यंत चित्रवाणीची वाटचाल झाली आहे. सरकारच्या अखत्यारीत असणारे 'दूरदर्शन' एकमात्र होते. दूरदर्शनने देशभरात महानगरांमध्ये केंद्रे सुरु केली तरी त्या केंद्राचे स्वतःचे कार्यक्रम आणि प्रसारणाच्या वेळा मर्यादित होत्या. उपग्रहाद्वारे प्रक्षेपणाला प्रारंभ होताच अनेक देशी-विदेशी टीव्ही कंपन्यांनी या क्षेत्रात प्रवेश केला. मनोरंजन, माहिती आणि बातम्यांचा खजिनाच खुला झाला. केवळ टी.व्ही., डिश अँटेना-सेटटॉप बॉक्स यामुळे तर दुर्गम भागातही वाहिन्यांचे जाळे पसरले आहे. या पार्श्वभूमीवर प्रा. डोळे यांची वर अवतरणात दिलेली विधाने (वा मते) तपासून पाहता येतील. मध्यमवर्ग, त्यांची मनोवृत्ती, त्यांची जीवनशैली, अभिरुची यावर टीका करणारा पत्रकार-समीक्षकांचा एक गट आहे. प्रा. डोळे त्यांचेच प्रतिनिधित्व करतात. सांस्कृतिक क्षेत्रे आणि प्रसारमाध्यमे यामध्ये काम करणारा वर्ग विशिष्ट जातीतूनच आलेला आहे. मध्यम व उच्चमध्यम वर्गीय समाजातील उच्च शिक्षितवर्ग माध्यमांकडे आकर्षित होत आहे. विशेषतः इंग्रजी पत्रकारिता आणि राष्ट्रीय पातळीवरील इंग्रजी व हिंदी वृत्तचित्रवाहिन्या! एन.डी. टीव्ही ही प्रणय रॉय यांच्यामुळे मान्यता पावलेली वृत्तवाहिनी आहे. (तुलनात्मक दृष्ट्या 'आज तक' अधिक लोकप्रिय आहे.) या वाहिनीतील पत्रकार अँकर, न्यूजरीडर, एडिटर, पोलिटिकल अॅनॅलिस्ट हे 'इन स्कूल' 'जे.एन.यू.' या परंपरेतून आलेले आहेत याचा अर्थ सर्वहारावर्गाच्या प्रश्नांची जाण त्यांना नाही असा काढता येणार नाही. 'व्यक्तिवाद' किंवा 'व्यक्तिकेंद्रितता' यामध्ये वाढ व्हावयास अनेक कारणे आहेत. टीव्ही हेच कारण नव्हे. शहरीकरण विभक्त कुटुंब पद्धती, फ्लॅटसंस्कृती, उच्चशिक्षित तरुण पिढीने परदेशात स्थानिक होणे यापासून कमालीच्या चंगळवादापर्यंत नानाविध कारणे व्यक्तिवादाला कारणीभूत आहेत. टीव्हीचे तोटे, गैरपरिणाम वगैरे प्रा. डोळे नमूद करतात. परंतु ही 'इडियट बॉक्स' आहे कळायला वेळ लागत नाही. रिमोट तर तुमच्या हातात आहे.

या माध्यमावर 'प्रेस कौन्सिल ऑफ इंडिया' सारखे कोणत्याही शासकीय निमशासकीय यंत्रणेचे नियंत्रण नाही. कोड ऑफ कॉंडक्ट म्हणजे आचारसंहिता








व नैतिक मूल्ये हे शब्दही वाहिन्यांवर काम करणाऱ्यांना बऱ्याच जणांना ठाऊक नसतात. संसदेपुढे यासंदर्भातील विधेयक आलेले आहे. हे विधेयक लवकर मंजूर होऊन त्याचे कायद्यात रुपांतर झाले तर चित्रवाहिन्या व वृत्तचित्रवाहिन्यांच्या अनिर्बंध प्रसारणाला कोठे तरी आळा घालता येईल. ज्या सरकारी दूरदर्शनचा निर्देश प्रा. डोळे याच लेखात करतात त्या दूरदर्शनने मर्यादा सांभाळून प्रक्षेपण केले आहे. मनुष्यबळ, पैसा व स्वायत्तता लाभली तर दूरदर्शन खासगी वाहिन्यांच्या स्पर्धेत टिकेल आणि वाढेलही!

'जे का रंजनाने गांजले, त्यासी म्हणावे बापुडे' आणि 'मीच चॅ-नल तू दामयंती' या आकर्षक मथळ्याचे लेख याच विभागात आहेत. या दोन्ही लेखात वृत्ताधारित व अ-वृत्ताधारित (न्यूज व नॉन न्यूज) कार्यक्रमांची चिकित्सा केली आहे. सभोवार घडणाऱ्या घटना चॅनेल्सच्या दृष्टीने कशा पर्वणी ठरतात याचे सोदाहरण विवेचन या लेखात आहे. रुपर्ट मरडॉक या माध्यमसम्राटाने टीव्ही क्षेत्रात जो अभूतपूर्व चमत्कार घडवला त्याचे परिणाम कसे घडत गेले तेही प्रा. डोळे नमूद करतात. दहशतवाद्यांचे हल्ले, 'अक्षरधाम'वरील गोळीबार, ट्रेड सेंटरवरील हल्ले, गुजरात निवडणुका व गोध्राची दंगल अशा कितीतरी बातम्या एका कॅमेऱ्याच्या माध्यमातून तुमच्या घरापर्यंत आणणाऱ्या या माध्यमांचे अर्थकारण, तथाकथित वस्तुनिष्ठता आणि वृत्तमूल्याचे बाजारीकरण या अनेक अंगांची विस्तृत चर्चा यात आहे. चॅनेल्सच्या आंतरराष्ट्रीय कंपन्या व त्यातील हेव्यादाव्याचे राजकारण यावर प्रा. डोळे प्रकाश टाकतात. चॅनेल्सवरील पॅनेल डिस्कशन व टॉक-शो हे फार वैचारिक वगैरे कधीच नसतात. मित्रपक्ष व शत्रूपक्ष अशा दोन टीम्स् आधीच ठरतात. ही चर्चा करणारे वा त्याचे सूत्रसंचालन करणारे यांचे वर्णन 'इडियट बॉक्स'र्स असे केले आहे. 'टॉक शो' किती बेगडी, वैचारिकतेचा खोटा आव आणणारे असतात हे नव्याने सांगावयास नको. तो 'इन्फोटेनमेंट'चाच भाग असतो. तेच तेच तज्ज्ञ, विश्लेषणकार, अभ्यासक या वाहिनीवरून त्या वाहिनीवर फिरत असतात. अशा हमखास, खात्रीच्या टीव्हीतज्ज्ञांची माध्यमांनाही गरज असते. त्यातून खुद्द त्या वाहिनीची अमुक एका प्रश्नाबद्दल ठाम, निश्चित भूमिका काय आहे हे समजू शकत नाही. त्या दृष्टीने वृत्तपत्रातील संपादकीय किंवा अग्रलेख याचे महत्त्व अजूनही कायम आहे हे लक्षात येते. बातम्यांच्या प्रक्षेपणाबद्दल वृत्त वाहिन्यांमध्ये टी.आर.पी.ची रेस असते. काय दाखवावे व किती दाखवावे याचे भान अपवादानेच आढळते. 'फाइल शॉट' (संग्रहीत दृश्य) किती वेळा दाखवावेत याला काही धरबंदच नाही. तिसऱ्या विभागात वृत्तपत्रीय भाषेचे स्वरूप आणि वाङ्‌मयीन पर्यावरणाची मीमांसा त्यांनी केली आहे. पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाने आयोजित केलेल्या चर्चासत्रात प्रा. डोळे यांनी प्रसारमाध्यमातील मराठीच्या स्थितीची कारणे स्पष्ट केली आहेत. वृत्तपत्र, नभोवाणी व चित्रवाणी या तिन्ही माध्यमातील भाषेमध्ये असणारा मूलभूत फरक डोळे प्रारंभीच नोंदवतात. दृक्‌श्राव्य संवेदना न देणाऱ्या मुद्रित माध्यमाची भाषा निर्जीव कशी म्हणता येईल? प्रसारमाध्यमातील भाषेची जडणघडण कशी होते, त्यासाठी कोणते घटक कारणीभूत असतात याचाही मागोवा यात आहे. मुळात वृत्तपत्र हे 'धांदलितले वाङ्‌मय' (लिटरेचर इन हरी) मानले जाते. भाषेची जडणघडण हा सतत प्रक्रियेचाच भाग असतो. वाङ्‌मयीन भाषेपेक्षा ती भिन्न असते. नवे शब्द, नवी परिभाषा, नवे वाक्‌प्रचार हे बातमीच्या, मथळ्याच्या भाषेतून आकाराला येतात. प्रादेशिक वृत्तपत्रांत भाषांतराची प्रक्रियाही तेवढीच महत्त्वाची असते. भाषेच्या घडण्याला किंवा बिघडण्याला ही प्रक्रियाही मदत करते. सामान्य वाचक वा प्रेक्षक समोर ठेवून केले जाणारे लेखन (किंवा वाचन) दिवसेंदिवस सदोष बनत आहे. माध्यमात कोणत्या जाती-वर्गातील माणसे काम करतात यावर काही अंशी या भाषेचे स्वरूप अवलंबून असते. समाजाच्या वेगळ्या स्तरातील व्यक्ती पत्रकारितेत येत आहेत. 'पत्रकारितेवर ब्राह्मणांची पकड होती' हे प्रा. डोळे यांचे विधान मर्यादित अर्थाने खरे आहे.

भाषेतून संज्ञापन होणे महत्त्वाचे असते. त्यामुळे वेगवेगळ्या जाती वा प्रदेशातील व्यक्ती वृत्तपत्रे

अनुक्रमणिका

व वाहिन्यांमध्ये काम करु लागल्या असल्या तरी किमान प्रमाण भाषेची गरज आहे. शुद्धाशुद्धतेची चर्चा ही सोवळ्याओवळ्यासारखी का केली जाते? वृत्तपत्राचा किंवा वाहिनीचा वार्ताहर जे लिहितो किंवा म्हणतो आहे ते एकाच वेळी सर्व साक्षर-शिक्षित-उच्चशिक्षित वाचकाला कळायला हवे ना? अर्थाचा अनर्थ करणारी, कर्ता कर्म क्रियापदाचा सुतराम संबंध नसणारी, लिंग-वचन भेदाची जाण नसणारी भाषा पुढे येते आहे. शब्दांचे खरे, मूळ अर्थ न समजून घेता ते शब्द कुठेही वापरले जातात. वृत्तपत्रे अजून या बाबतीत निर्ढावलेली नाही. चुका दुरुस्त होतात. चुकांचा पाढा वाचून समज दिली जाते. अशी यंत्रणा वृत्तवाहिन्यांमध्ये नाही. असली तर तिचे अस्तित्व दिसत नाही.

याशिवाय या संग्रहात धर्म, राजकारण, भाषा, समाज आणि प्रसारमाध्यमे यांचा परस्परसंबंध यांची चर्चा करणारे काही लेख आहेत. त्यातील बहुतेक प्रासंगिक, स्फुट स्वरूपाचे आहेत. माध्यमांतील स्त्रियांची प्रतिमा तसेच स्त्री संपादक याबद्दलचे लेख प्रासंगिक वाटतात. इंग्रजी वृत्तपत्रे व वृत्तवाहिन्यात महिला पत्रकार मोठ्या संख्येने आहेत. 'इलेक्ट्रिक मुसळ इलेक्ट्रॉनिक केरात....' हा मीडिया कॉन्व्हर्जन्स आणि इंटरॲक्टिव्ह माध्यमाविषयी भाष्य करणारा लेख आहे. संदेशवहनाची साधने बदलत गेली, नवी साधने आली, येत आहेत. या साधनांमुळे माहितीचा धबधबा ग्राहकावर कोसळतो आहे. तो त्याला हवा आहे का, त्यासाठी त्याची क्रयशक्ती आहे का, त्यातील अनावश्यक, अप्रस्तुत, निरुपयोगी माहितीचे त्याने काय करावयाचे या मुद्यांची या लेखात घुसळण आहे. 'मार्केट इकनॉमी'चे रूपांतरणच माहितीच्या बाजारपेठेत झाले आहे. तंत्रज्ञानाने त्याला साथ दिली आहे. एस. एम. एस., ई-मेल, ब्लॉग ही साधने नव्या पिढीच्या अंगवळणी पडली आहेत. 'ब्लॉग' हा मात्र व्यक्तिकेंद्री आहे. 'ब्लॉग' म्हणजे पर्यायी-माध्यम आहे का? प्रस्थापित नियतकालिकांच्या ('सत्यकथा') विरोधात संतप्त तरुण लेखकांनी मराठीत लघु-अनियतकालिके (लिट्ल मॅगझिन्स) काढली होती. चाळीस वर्षांपूर्वीची ही घटना आहे. प्रस्थापित माध्यमांनी दडविलेली माहिती देण्याचे कार्य ब्लॉग करतात. याचा अर्थ प्रस्थापितांच्या विरोधात उभी राहणारी एक आधुनिक माध्यमातील चळवळच आहे. 'माझे विचार, मते, आवडीनिवडी कळविण्यासाठी मला हे माध्यम जवळचे, आपले वाटते' अशी ब्लॉगर्सची भावना आहे. इथे प्रा. डोळे म्हणतात ती स्वकेंद्रितवृत्ती वाढीला लागते. अर्थात हे अपरिहार्य आहे.

प्रा. जयदेव डोळे कृत प्रसारमाध्यमांची झाडाझडती ही या स्वरूपाची आहे. या लेखसंग्रहाला तात्कालिकतेच्या, प्रासंगिक वृत्तपत्रीय लेखाच्या मर्यादा असल्या तरी त्याची जमेची बाजूही बरीच आहे. माध्यमांविषयी टीका करणारे लेखन फारसे कोणी करत नाही. शिवाय आपलेच परीक्षण कोणाला आवडणार? इंग्रजीत माध्यमविषयक शोधपत्रिका (रिसर्च जर्नल्स) आहेत. 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ मास कम्युनिकेशन' ही दिल्ली येथील माध्यमाचे शिक्षण देणारी संस्था 'कम्युनिकेटर' प्रसिद्ध करते. पत्रकार संघटना, वृत्तपत्रविद्येचे शिक्षण देणाऱ्या संस्थांनी एकत्र येऊन मराठीला किमान निम-गंभीर स्वरूपाचे नियतकालिक काढावयास हवे, म्हणजे प्रसारमाध्यमांना आपल्याच आरशात आपले रूपडे न्याहाळता येईल.

(समाचार अर्थात प्रसार माध्यमांची झाडाझडती : प्रा. जयदेव डोळे, प्रकाशन : लोकवाङ्मयगृह, मुंबई. किंमत रु. २००, पृष्ठे २५६)

✤ ✤ ✤

# परीक्षण लेख

# तणकट

प्रा० द० तु० पाटील




तणकट, राजन गवस. प्रकाशक : बाबा भांड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद. किंमत : रू. १५०/- (पृष्ठ संख्या २३९)

गेल्या सुमारे पाऊणशे वर्षापासून दलितेतर लेखक आपल्या कथाकादंबऱ्यातून दलितांचे चित्रण करू लागले आहेत. दलितेतरांचे दलित जीवनाचे चित्रण चालू असतानाच साठीच्या दशकात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या प्रेरणेतून निर्माण झालेल्या दलित साहित्याने सुरुवातीपासूनच आपले वेगळेपण दाखवायला चालू केले. पुढच्या काळातही चांगल्या दलित साहित्यकृतीच्या तुलनेने दलितेतरांच्या साहित्याचा दर्जा दुय्यमच राहिला. दलित साहित्याइतकी रसरशीत अनुभवाची प्रत्ययकारिता आणि विदारकता दलितेरांनी लिहिलेल्या दलित जीवनावरच्या साहित्यात दिसत नाही. त्या पाठीमागचे कारण सांगताना गो. मा. पवार म्हणतात, 'बघण्याचेही आतून बघणं आणि बाहेरून बघणं असे दोन प्रकार आहेत. दलितेतरांना दलितांच्या प्रश्नांकडे बाहेरून बघणं शक्य आहे, पण आतून बघणं फक्त दलितालाच शक्य आहे. अनिल अवचट भटक्या जमातीचे कितीही सहानुभूतीनं चित्रण करोत, पण त्यांना लक्ष्मण मानेंनी 'उपरा'त वर्णन केलेले अनुभव चित्रित करणं शक्य नाही. व्यंकटेश माडगुळकरांनी अस्पृश्यांची चित्र चांगली रंगविली आहेत. पण त्यांना बाबूराव बागुलांचा feel देता येणार नाही. केवळ सहानुभूती तेथे अपुरी आहे.'[१]

आज दलितेरांनी दलित जीवनावर लिहिणे ही अप्रुपाची आणि कौतुकाची गोष्ट राहिलेली नाही. अशा या काळात राजन गवस यांची दलित जीवनावरची 'तणकट' (१९९८) कादंबरी प्रकाशित झाली आणि २००१ साली तिला साहित्य अकादमीचा पुरस्कार दिला गेला.

या पुरस्कारानंतर 'साहित्य अकादमी पुरस्कार प्राप्त कादंबरी' असा मुखपृष्ठावर मजकूर छापलेल्या या कादंबरीच्या आणखी सलग दोन आवृत्त्या प्रकाशित झाल्या. ती एक फार मोठी ताकदीची कादंबरी आहे, असा काही मान्यवरांनी निर्वाळा दिला आहे. "त्यांच्या 'तणकट' या आणखी एका नव्या कादंबरीत खेड्यातील जातीव्यवस्था, गावगाडा, गाव आणि महारवाडा यांच्यातील नाते, त्यात होत जाणारे बदल यांचे विविध मानवी प्रवृत्तीच्या व्युहात उभे केलेले प्रभावी चित्र आहे. व्यंकटेश माडगूळकर यांच्यानंतर ग्रामव्यवस्थेतील ताण्याबाण्याची आतून-बाहेरूनची समज राजन गवस यांनी तितक्या ताकदीने प्रकट केली आहे, असे म्हणता येते."[२] हा अभिप्राय लेखकाच्या जवळच्या मित्राचा आहे. असाच अभिप्राय नागनाथ कोत्तापल्ले यांचा आहे.[३] अशोक बाबर यांना ती नव्या जाणिवेची अस्सल देशी कादंबरी वाटते. त्यांच्या मते 'तथाकथित दलित विचारवंत, चळवळ आणि साहित्यिक यांनासुद्धा साध्य न झालेल्या एका नव्या जाणिवेतून गवस आपणास जातीयता व जातीव्यवस्था या उभ्या-आडव्या सूक्ष्मातीसूक्ष्म भेदाकडे पहायला लावून अगदी बुद्धापासून ते गांधीजींपर्यंतची जी सलग देशी परंपरा आहे त्या परंपरेची जाणीव करून देतात. त्यामुळे तणकट वाचणाऱ्या वाचक-समीक्षक यांना ही कादंबरी वाचताना स्वजातीच्या बाहेर पडूनच वाचन करावे लागते आणि तसे न घडल्यास त्या कादंबरीतील नवनैतिकेच्या कसोटीला अगदी वाचकसुद्धा उतरू शकत नाहीत, हेसुद्धा एवढेच महत्त्वाचे.'[४]

'तणकट'ची अशी भलामण करून तिची गुणवत्ता ठासून सांगितली गेली आहे. मला मात्र ही

कादंबरी फारशी समाधान देत नाही. तिच्यामध्ये अनेक दोष दिसून येतात. विशेष म्हणजे, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी गावगाड्यातील ज्या पारंपरिक सनातनी व्यवस्थेला विरोध केला होता ती व्यवस्था ही कादंबरी उचलून धरताना दिसते. म्हणून यथायोग्य मूल्यमापनातून तिचे हे खरे स्वरूप उलगडून दाखविणे महत्त्वाचे वाटते.

'तणकट' कादंबरीचे मुख्य कथानक प्रामुख्याने महाराष्ट्र-कर्नाटक सीमेवर असलेल्या कोल्हापूर जिल्ह्यातील गडहिंग्लज-गारगोटी परिसरातील एका खेडेगावात घडते. त्याचबरोबर चळवळीचे केंद्र असलेले तालुक्याचे ठिकाण. कादंबरीचा नायक कबीर शिक्षण घेत असलेले तेथील महाविद्यालय, तालुक्याच्या आसपासच्या गावात घडणाऱ्या दलित-सवर्ण यांच्यातील किरकोळ घटना यातून कादंबरीचे कथानक आकाराला येते. कथानकाच्या केंद्रस्थानी असलेल्या गावात गटातटाचे राजकारण आहे. सवर्णांच्यात जसे गट आहेत तसे दलितांच्यातही आहेत. गावात सवर्णांच्या चार गल्ल्या आहेत. त्यात शिंदे, राणे असे खानदानी मराठा आहेत. पाटील आहेत. सुतार, न्हावी असे बलुतेदार आहेत. गावात तीस-चाळीस घरांचा म्हारोडा आहे. त्याच्या बाजूला मांगोडा आहे. ढोरांची तीन-चार घरं आणि पन्नास-साठ वडारांची घरं आहेत. या सर्व दलितांचे पोट सवर्णावर अवलंबून आहे. गावकीची, शेतमजुरीची कामे करून ते आला दिवस ढकलत असतात.

गर्भश्रीमंत असलेला खानदानी मराठा आक्काबा राणे ही गावातील प्रतिष्ठित व्यक्ती आहे. हा म्हातारा गावाने गुण्यागोविंदाने नांदावे यासाठी झटताना दाखविलेला आहे. सगळ्यांच्या चुका पोटात घालणारा, गटातटाच्या राजकारणात सबुरीचा सल्ला देणारा आक्काबा लेखक चित्रित करतो. याउलट बाळासाहेब शेडबाळेचा स्वभाव दाखवून देतो. तो लेकावळा आहे. घरच्या गरिबीत लहानाचा मोठा झालेला बाळासाहेब आक्काबाच्या मदतीने जिल्हा बँकेत नोकरी मिळवितो. डेअरी सोसायटी यामध्ये संचालक होतो आणि मग आर्थिक स्थैर्य प्राप्त झाल्यानंतर आपले गुण उधळायला चालू करतो. दादू म्हाराला जोडीला घेऊन डेअरीत साठ हजाराचा भ्रष्टाचार करतो आणि अत्यंत हुशारीनं कागदपत्रात आपण कुठे सापडू नये याची दक्षता घेतो. त्यामुळे चेअरमन बंडू पाटील आणि सेक्रेटरी संकटात सापडतात. चिडलेला बंडू पाटील गावच्या वाटेवर आपल्या माणसांच्याकडून बाळासाहेबाला चोप देतो. व्हिवळत पडलेल्या बाळासाहेबांची बातमी आक्काबाच्या कानावर येताच आपल्या स्वभावधर्मानुसार म्हातारा बाळासाहेबाला दवाखान्यात दाखल करतो. पण बाळासाहेब आपल्या स्वभावावर जातोच. तो आपल्याला मारहाण झाल्याची केस घालताना त्यामध्ये आक्काबाचे नावही घालतो.

यातून बाळासाहेब आणि गावकरी यांच्यात संघर्ष सुरू होतो. त्याच्या अगोदर बाळासाहेबाने दादू म्हाराच्या मदतीने म्हारोड्याला आपल्या बाजूला घेतलेला असतो. दलित तरुण मुलांना हुशारीने आपल्या कळपात ओढतो. त्यांनाही तेच पाहिजे असते आणि मग गावकरी-बाळासाहेब यांच्यामधील संघर्षाला वेगळे वळण मिळून तो संघर्ष सवर्ण - महार यांच्यामध्ये सुरू होतो. त्याला गावाबाहेरचे दलित चळवळीतील कार्यकर्ते खतपाणी घालण्याचे काम करतात.

या संघर्षाच्या चित्रणातून लेखक दलित चळवळ आणि सुशिक्षित दलितामधील वैगुण्य तर दाखवून देतोच. त्याशिवाय त्यांच्या स्वार्थी, आक्रस्ताळी स्वभावामुळे गावगाड्यातील दलित समाज भरडलेला दाखवून असा संघर्ष सध्यातरी दलितांच्या हिताचा नसून दलितांनी सवर्णांशी सबुरीने वागून, त्यांची अडली-नडली कामे करून जगणे यातच त्यांचे भले आहे, असा अत्यंत सनातनी विचार कथानकातून रुजविण्याचा प्रयत्न करतो. त्यासाठी तशा प्रकारच्या घटनाप्रसंग आणि व्यक्तिरेखांची निर्मिती लेखकाने केली आहे.

बोरवट्टी गावातील यमूना ठकू कांबळे या दलित स्त्रीवरील अत्याचाराची घटना कादंबरीत पृष्ठ क्रमांक ५०,५१ वर येते. ती स्त्री सोमशेट्टी नावाच्या


अनुक्रमणिका

लिंगायत माणसाच्या परसात झाडलोटीचे काम करीत असताना तिच्यावर सोन्याची चेन चोरल्याचा आळ घेतला जातो आणि ती कबूल होत नाही म्हटल्यानंतर गावच्या चावडीत नेऊन मारहाण केलेली असते. चळवळीतील नेते मंडळींना तेच पाहिजे असते. आलेली संधी ते सोडत नाहीत. आपल्यापर्यंत बातमी येताच ते बैठका घेतात. मोर्चा काढतात. भाषणे ठोकतात आणि आपल्या नेतेपदाची हौस भागवून घेतात. त्या अत्याचारग्रस्त स्त्रीविषयी त्यांना कळवळा नसतो. पुढे या प्रकरणाचे काय झाले याचे चित्रण कादंबरीत येत नाही. दलित चळवळीचे दिखाऊ स्वरूप दाखवून देण्यासाठी लेखकाने ही घटना घातलेली आहे.

या घटनेनंतर मुख्य कथानक ज्या गावात घडते त्या गावातील आप्पुण्या महाराला सवर्ण समाजातील आण्णाप्पाने केवळ त्याची म्हैस आपल्या पिकात आली म्हणून बेदम मारहाण केल्याची घटना पृष्ठ क्रमांक ७२, ७३ वर येते. पहिली घटना घालण्याचा लेखकाचा जो हेतू आहे तोच हेतू या घटनेमागेही आहे. त्यामुळे तशाच पद्धतीने या घटनेनंतर घडणाऱ्या घटनांचे लेखक चित्रण करतो. आप्पुण्याला मारहाण झाल्यानंतर विद्रोही बनलेली दलित मुले आण्णाप्पाच्या घरावर मोर्चा नेतात. लेखकाने तो मोर्चा फसलेला दाखवून दिला आहे. नंतर ही दलित मुले सवर्णांच्या शेतात कोणीही मजुरीला जायाचे नाही, असे ठरवून गावावर बहिष्कार घालतात. जालिंदर बनसोडे, आनंदा कांबळे अशा गावाबाहेरच्या दलित कार्यकर्त्यांचे त्यांना पाठबळ मिळते. त्यांच्या मार्गदर्शनाखाली गावाबरोबर संघर्ष चालू राहतो. आप्पुण्याला मारहाण झाल्याची बातमी वर्तमानपत्रांना द्यायची व्यवस्था केली जाते. एस. पी. ला निवेदन दिले जाते. मुख्यमंत्र्यांपासून ते पंचायत समितीच्या सभापतीपर्यंत त्यांच्या प्रती पोहचविल्या जातात. आप्पुण्याच्या मनाविरुद्ध पोलिसात तक्रार नोंदविली जाते आणि गावाने बहिष्कार घातला नसताना गावाने बहिष्कार घातला असा खोटा आरोप ठेवला जातो. गावात पोलिस येतात. आण्णाप्पाला पकडून नेतात. त्याला पकडून नेल्याची बातमी आप्पुण्याला समजल्याबरोबर तो घाबरून जातो. त्याच्या अंगातील अवसान निघून जाते आणि हुरहुडी भरते. शेवटी त्याला दवाखान्यात न्यावे लागते.

या प्रकरणाला शेवटी लेखक वेगळीच कलाटणी देतो. दवाखान्यातील आप्पुण्याला आण्णाप्पाचे वडील आणि आक्काबा राणे बघायला जातात. खर्चासाठी पैसे देतात आणि दवाखान्याचे बील भागविण्यासाठी ज्याने मारले त्या आण्णाप्पाला पाठवून देतो असे सांगून येतात. तिकडे पकडून नेलेल्या आण्णाप्पाला पोलिस काहीही करीत नाहीत. एकूण हे प्रकरण मिटल्यात जमा होते.

अत्यंत क्रूर अशा अमानुष घटनेचे उदात्तीकरण केलेला हा शेवट लेखकाची नैतिकता उघडी पाडतो. सवर्णांनी दिलेला मार दलितांनी निमूटपणे खायचा. नंतर मार देणाऱ्याकडून दवाखान्याचे पैसे भागविण्यासाठी मदत घ्यायची आणि झाले गेले विसरून जायाचे. हे कशासाठी तर गावगाड्यातील दलित-सवर्ण संबंध सलोख्याचे राहण्यासाठी होय. म्हणून तर लेखक गावातील दलित तरुण मुले, चळवळीतील कार्यकर्ते यांनी घेतलेले निर्णय चुकीचे आणि फसलेले दाखवितो आणि त्यातून चळवळीतील कार्यकर्त्यांचे दुर्गुण दाखवून देण्याचा मुख्य हेतूही तडीस नेतो. पण आज स्वातंत्र्याच्या पन्नाशीनंतरही गावगाड्यातील दलितांच्यावर अशा अत्याचाराच्या घटना घडतात हाच लेखकाचा खरा चिंतेचा विषय असायला पाहिजे होता.

कादंबरीतील पुढच्या भागात क्रमाने येणाऱ्या घटनाप्रसंगातून लेखकाचा दलित चळवळ, सुशिक्षित दलित यांच्याकडे बघण्याचा दृष्टिकोण समजून येतो. त्यामुळे नवीन येणाऱ्या घटनाप्रसंगाविषयीचा कथाभाग वाचण्याअगोदर लेखक त्यातून काय सांगणार हे समजते. कादंबरीच्या उत्तरार्धात दीक्षित गुरुजी, तातोबा, मन्या या सुशिक्षित दलित व्यक्ती येतात. त्यांचे वर्तन त्यांच्याविषयीचा कथाभाग वाचण्याअगोदर कसे असेल हे स्पष्टपणे समजून येते. अशा पद्धतीच्या चित्रणाने

कथानकाच्या घडणीतील नैसर्गिकपणा आपोआप निघून जातो आणि कथानक मुद्दामहून घडवून आणल्यासारखे वाटते. संपूर्ण कादंबरीत दलित चळवळ, सुशिक्षित दलित यांच्यामधील वैगुण्य दाखविणाऱ्या घटनाप्रसंगांची उतरंडच लेखकाने रचलेली दिसते.

सवर्णांनी दलित स्त्रियांची शेताकडे जाताना वाट अडविली नसतानाही तशी खोटी तक्रार पोलिस स्टेशनमध्ये नोंदवून विनाकारण सवर्णांना त्रास दिला जातो. गणू पाटलाचे कापणीला आलेल्या भाताच्या पिकाचे कोणीतरी रात्रीचे नुकसान करून गेलेले असते. गणू पाटलाचा संशय दलित मुलांच्यावर असतो. लेखक दलितामधील कबीर आणि थळू म्हाताऱ्याच्या तोंडी पुढील संवाद घालतो आणि त्या संशयाला बळकटी आणतो.

'कबरूऽऽ कुंडक्यातलं भात कधी कापणार गा?' थळू आज्जानं भेटल्या भेटल्या पहिला प्रश्न केला. कबीरच्या डोक्यातही तेच घोळत होतं.

'कापाव म्हणतोय या चार दिवसात'

'घरातच बडवून काढायचं म्हणतोस काय मळणी घालणार?'

'मळणी घालाय आता कुठं दहा खंडीचं रान हाय. हितचं बडवून काढायचं आपलं'

'लवकर आन कापून. लोकांची न्यात बदाललीया. कल कुठं गणू पाटलाचं शेतातच तोडून पाडून नाशिवलं म्हणं'

'काय?' कबीरला एकदम आश्चर्य वाटलं.

'व्हयं लेकरा, हुबं पीक नुस्तं खुरप्यानं तोडून पाडलं म्हणं'

'कुणाचं काम आसल?'

'देवाला ठावं, खरं पाटलाच्यात ह्या आमच्या भाड्यांचीच नावं घालत्यानी'

'कुणी आपल्या पोरांनी?'

'त्येनी नावं घ्याल्यात. त्येचं तरी काय चूक म्हणाय येतय? ह्या भाड्यांनी एक एक त्यास्नी तरास द्यायचंच कराल्यात म्हटल्यावर त्यास्नी वाटणारच की.'

'तुला काय वाटतंय?'

'आता कसा इसवास देणार? आता ही कार्टी खुट्ट्या खुट्ट्या एवढी न्हाईत तर पिऊन ल्हास आसत्यात. नशेत गेली आसली तर गेली आस्तील' (पृ. १८५)

आण्णाप्पाला पोलिसांनी पकडून नेल्यानंतर आक्काबा म्हातारा पोलिस स्टेशनमध्ये जातो. त्यावेळी फौजदार आणि आक्काबा यांच्यामध्ये पुढील संवाद होतो-

'पोलिस स्टेशनात आण्णाप्पाची उस्तवार फौजदारनं चांगलीच ठेवली होती. बहुतेक आमदारानं त्याला सूचना दिली असणार, हे आक्काबानं ओळखलं, आलोच आहे पोलिस ठाण्यात तर साहेबाला राम राम करून जावं म्हणून आक्काबा पुढं झाला. नुकताच येऊन बसलेला फौजदार आक्काबाला समोर बघून 'या या' म्हणतच अघळपघळ हसला. आक्काबा त्याच्या समोरच्या खुर्चीवर टेकला.

'बोलाऽऽ राणे, आणलेत का बाकीचे आरोपी? आणून एकदा हजर करून टाका' म्हणतच फौजदारानं टेबलावरची बेल दाबली. आलेल्या पोलिसाला तीन चहाची आर्डर दिली. आक्काबानं एकूण वातावरणाचा रागरंग ओळखला आणि म्हणाला, 'सायेब काय काय करूया आता?'

'करायचं काय? दुपारपर्यंत कागदं तयार करून कोर्टासमोर हजर करतो. बाकीच्यांना उद्यापर्यंत घेऊन या'

'तापच झाला सायेब'

'चालायचंच. कायदा त्यांच्या बाजूला आहे. त्यामुळं त्यांचं काहीही चालतं. आमचेही हात बांधल्यासारखे झालेत.'

फौजदार हळू आवाजात म्हणाला. आक्काबाच्या ध्यानात अर्थ आला तसा म्हातारा थोडं सैल होतच म्हणाला,

'साहेब, खरं बोलायचं तर आशानं आता उलटं व्हयालंय. आदी कधी आमच्या मनात यायचं न्हाई

त्ये आता यायला लागलंय. आशानं काय व्हयाचं?'

'काय सांगायचं राणे तुम्हाला' फौजदार एकदम खाजगी आवाजात खुर्ची सरकवत म्हणाले, 'आम्ही सांगू नये पण तुम्ही साहेबांचे पाहुणे लांबून आमचेही पावणेच. मी तासगावचा शिंदे तुम्हाला म्हणून सांगतो, आमच्या ह्या ठाण्यात चारच त्या जातीचे पोलिस आहेत पण चौघांनी मला दम आणलाय. एकसुद्धा दिवसभर शुद्धीत नसतोय. कायम फुल्ल. माणसं शोधायची, पैसे काढायचे की झोकूडन फुल्ल. ह्येच्या बायका इथं येऊन रडत बसतात. काय करणार? शेवटी वैतागून मागच्या महिन्यापासून दोघांचे पगार त्यांच्या बायकांकडंच द्यायला सुरुवात केलीय. बिचारी ती तरी पोटाला पोटभर खातील. अशा लोकांना काय सांगणार? त्यापेक्षा त्यांच्या नादालाच न लागलेलं बरं. आसली आमच्याबी जातीत हाईत खरं कमी!'

'नादाला आपण नाही लागलो तरी आता तीच कळ काढाय लागल्यात, काय करायचं सांगा?' आक्काबानं विषय वाढवत नेला. त्याला एकूणच सगळं लख्ख वाटत होतं. त्यामुळे डोक्यावरचं निम्म ओझं कमी झालं होतं.' (पृष्ठे १०५, १०६)

लेखक सनातनी विचार फौजदार आणि आक्काबा राणे यांच्या तोंडी घालतो. Atrocity Act विरोधी आज जे बोलले जाते त्याला लेखक प्रत्यक्षात पोलिस खात्यातील फौजदाराकडूनच बळकटी देतो. आप्पुण्यावरील अत्याचाराची गांभिर्याने दखल घेऊन दोषींवर योग्य ती कारवाई करायची सोडून हा फौजदार आरोपीची पोलिस स्टेशनमध्ये चोख व्यवस्था करतो. असा हा स्वतःच्या कामात अप्रामाणिक असलेला फौजदार दलितांची वैगुण्य सांगण्याचे काम करतो. जातीयतेच्या घट्ट पीळामुळेच फौजदार आणि आक्काबा यांच्या तोंडी दलितांविषयी अशी भाषा येते. अन्यथा ते असे बोलले नसते. यामध्ये लेखकाची भूमिका ही फौजदार आणि राणे जे बोलतात ते उचलून धरणारी आहे. दलितावरील अत्याचाराची गंभीर दखल न घेता आरोपींनाच पोलिस खात्याने संरक्षण दिले तर अत्याचारी दलितांनी काय करायचे हा गंभीर प्रश्न लेखकाला अस्वस्थ करीत नाही.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या जयंतीच्या मिरवणुकीत दारू पिऊन दंगा घातला जातो आणि विनाकारण सवर्णांना शिव्या देऊन डिवचले जाते. बाळासाहेबांच्या मदतीने दलित मुले 'जय भीम तरुण मंडळ' काढतात आणि त्या मंडळाला गावठाणातील पाच गुंठे जागा कलेक्टरकडून मंजूर करून आणतात. त्या जागेवरून दलित-सवर्ण संघर्ष सुरू होतो.

सवर्णांच्या विरोधाला न जुमानता बाळासाहेब आणि दलित मुले पायाउभारणीचा कार्यक्रम करायला जातात आणि त्याचवेळी दगडांचा वर्षाव होतो. त्यात काहीजण जखमी होतात. नेहमीसारखेच या प्रकरणातही दलित नेतेमंडळी स्वतःचा फायदा उठवायला चालू करतात. मग वर्तमानपत्रातून भडक बातम्या देण्याची व्यवस्था करणे, मोर्चा, निवेदन हे नेहमीचेच चालू होते.

दलित - सवर्णांमधील संघर्षाबरोबर दलितांतर्गत महार व मांग या दोन जातीमधील दुराव्याचे आणि त्यांच्यातील तणावाचे चित्रण कादंबरीत येते. या चित्रणापाठीमागचा उद्देशही दलितांमधील वैगुण्य दाखवून देणे हा आहे हे आलेल्या चित्रणावरून सहज समजून येते.

यल्लाप्पा मांग आणि दादू महार यांच्यातील हेड्याच्या धंद्यातील आर्थिक व्यवहारामधील भांडणाच्या निमित्ताने गावातील महार आणि मांगामध्ये तणाव निर्माण होतो. मग पुढे गावाबरोबरच्या संघर्षात महार समाजाला मांग समाज साथ देत नाही. महार मुलांनी बँजो पार्टी काढली म्हणून त्यांच्या इर्षेवर मांगोड्यातील मुले झांजपथक काढतात, असे या तणावाचे स्वरूप आहे.

दोन भिन्न जातीतील व्यक्तींच्या वैयक्तिक आर्थिक व्यवहारातील भांडणाचे पर्यावसान त्यांच्या जातीतील तणावामध्ये झालेले समाजात आपणाला कधी दिसत नाही. ग्रामीण समाजात तर अशा आर्थिक व्यवहारात बरोबर कुणाचे आहे ते बघून त्याची बाजू

घेतली जाते. आप्पुण्या महाराला सवर्णांकडून मारहाण झाल्यानंतर मांग समाजातील एकाही व्यक्तीला त्याच्या वेदना होताना दिसत नाहीत. एकही व्यक्ती त्याविरोधी बोलताना दिसत नाही, याचे आश्चर्य वाटल्यावाचून राहत नाही.

गावातील महार व मांग यांच्यात जसा लेखक तणाव दाखवतो तसाच तो गावाबाहेरील महार व मांग यांच्यातही दाखवतो. गावाबरोबर महारांचा संघर्ष सुरू झाल्यानंतर डेप्युटी गोपाळचा नेसरीचा साडभाऊ आलेला असतो. तो बाळासाहेबाला सांगतो, 'सायेब तसलं काय डोक्यात नका घेऊ. ती मांगटी लई तिरपागडी असत्यात. एक वेळ वडर येतील तुमच्यात पण ती येणार न्हाईत. हे मी अनुभवानं सांगतोय. आमच्या एका महार कंडक्टरला आमच्या सायबानं 'म्हारड्या सरळ वागाय शिक' म्हटलं, मग आमी सगळ्यांनी एकत्र येऊन ह्या गोष्टीचा विचार केला. जवळ जवळ आमच्या समाजाचे आमी पंधराजन होतो. मांगाची सहाजन आमच्यात सामील करून घेतली. वरच्या सायबाकडं अर्ज करायचं ठरलं. अर्ज केला. चौकशी लागली तवा ही सहाच्या सा मांगटी एकदम पालटली आणि सायबाला लागू झाली. लई इसवास घातकी जात त्यास्नी आमच्या समाजाचं कायसुद्धा बघवत न्हाई. त्येंच्या समाजात कुठं बाबासायबाचा फोटो बघितल्यासा? त्यास्नी म्हाराचं वाईट लागतंय म्हणून त्यास्नी तेवढं घीऊ नका मिलपात. लई घातकी.' (पृ. ११९)

दोन जातीतील वैमनस्य लेखक असे टोकदार करून सांगतो. प्रा. अवचित भालेराव या मांग समाजातील व्यक्तीची निर्मिती लेखकाने महार आणि मांग यांच्यातील दुरावा आणि ताणतणाव दाखवून देण्यासाठीच केली आहे. हे पात्र नेहमी महाराविरोधी बोलताना दिसते.

दलित सवर्ण संघर्ष असो किंवा महार–मांग यांच्यातील संघर्ष असो. लेखकाला त्याचे यथायोग्य चित्रण करता आलेले नाही. कबीर शिक्षण घेत असलेल्या महाविद्यालयातील दलित प्राध्यापक, विद्यार्थी आणि ब्राह्मण प्राध्यापक, विद्यार्थी यांच्यामध्ये दाखविलेल्या संघर्षाचे चित्रण तर खूपच बालिश वाटते. महाविद्यालयात बहुसंख्य असलेल्या मराठा समाजाच्या प्राध्यापक आणि विद्यार्थ्यांना या संघर्षापासून अलिप्त ठेवले आहे हे विचार करायला लावणारे आहे.

बाळासाहेब आणि रामा महाराची बायको सुली यांच्यामधील विवाहबाह्य लैंगिक संबंध हे एक कादंबरीतील महत्त्वाचे उपकथानक आहे. बाळासाहेबा-बरोबर संबंध ठेवण्यापूर्वी सुली सवर्णांच्यात शेतमजुरीला जात असे. प्रामाणिक आणि कष्टाळू स्वभावामुळे तिला कामाला फारजण बोलवत असतात. ती बाळासाहेबांच्या बांधाला जाते आणि हळूहळू तिच्यात बदल व्हायला लागतो. ढोर मेहनत करणाऱ्या नवऱ्याकडून सुख नाही. घरची गरिबी आणि सात वर्ष होऊनही मूल नाही, अशा कारणांनी तिचे पाऊल वाकडे पडते. मग बाळासाहेबांचे तिच्या घरी राजरोसपणे येण–जाणे सुरू होते. सुली मजुरी बंद करते. या संबंधाला अडथळा असणाऱ्या तिच्या नवऱ्याची हतबल अवस्था निवेदनातून चित्रित होते.

'कधी कधी शेडबाळ्याच्यात कामाला जाणाऱ्या सुलीला त्यानंच शेडबाळेकडचं दोन मण भात उसणं आणायला लावलं होतं. त्यावेळी बाळ्याच्या घरला जाऊन त्यानंच पैशाची उचल करायला सुरुवात केली होती. त्यात हळूहळू त्यानं सुलीला अडकवलं आणि मग सुलीच्या आणि रामाच्या हातात काही उरलं नाही, हे त्याच्या लक्षात आलं तेव्हा वेळ निघून गेलेली. उंडग्या जनावराला एकदा इरड करायची सवय लागली की, ती कशी सुटणार? अगदी तळपायाची आग मस्तकाला जाऊनही तो काय करू शकत नव्हता.

आणि सुलीला सोडण्याइतपत धाडसही त्याच्यात नव्हतं. तिला सोडून नवीन लगीन करायची उमेद त्याच्यात नव्हती. मारून टाकायचं धाडस नव्हतं. त्यात लगीन झाल्या झाल्या सुलीचं पोटपाणी पिकवलं असतं तर त्याला बोलायला जागा होती. पण तिथंही

त्याला नशिबानंच दगा दिला होता. उलटी सुलीच त्याला दोष देत होती. या सगळ्यात बाळ्या शेडबाळ्या घरखर्च चालवत होता. हवं नको बघत होता. म्हाकबा मांगाचं लग्नाच्या वेळी काढलेलं कर्जही त्यानंच भागवलं होतं. नाही म्हटलं तरी सुलीला म्हयन्याला एक नवं छापील लुगडं घरात येत होतं. मग बोलणार तरी कुणाला? आणि कुठल्या तोडानं? एकदा-दोनदा रागाच्या भरात हात उचलून बघितला तर सुली घरच घुसतो म्हणाली आणि डोळ्यासमोर ते व्हायला नको म्हणून तो गप्प बसला....' (पृष्ठे ४२, ४३)

या संबंधाला इतरही कुणाचा अडथळा येत नाही. खरे तर दोन जातीतील अशा विवाहबाह्य संबंधाकडे ग्रामीण समाज फार गांभीर्याने पाहतो. त्यामध्ये विशेषतः ती स्त्री ज्या जातीची असते त्या जातीची समाजामध्ये फार मानहानी होत असते. त्या जातीला तो फार मोठा आपला अपमान वाटत असतो. म्हणून समाजामध्ये असे विवाहबाह्य संबंध जातीय संघर्षाला फार जबाबदार ठरताना दिसतात. हमीद दलवाई यांच्या 'इंधन' कादंबरीत त्याचे फार चांगले चित्रण येते. 'तणकट'मध्ये बाळासाहेबाबरोबर असणाऱ्या एकाही दलित तरुणाला हा संबंध खटकत नाही. त्यातील कोणीही त्याविरोधी बोलताना दिसत नाही. उघड नाही जमले तरी खासगीत तरी नाराजी प्रकट करायला पाहिजे होती पण तशी केली जात नाही. या कादंबरीच्या सुमारे बत्तीस वर्ष अगोदर लिहिलेल्या 'इंधन' कादंबरीतील नवबौद्ध समाज आपल्या समाजातील लक्ष्मीने मुसलमान समाजातील इसाकबरोबर विवाहबाह्य लैंगिक संबंध ठेवले म्हणून खवळून उठतो. इसाकच्या घरात घुसून तिला घेऊन यायचे धाडस करतो. जागृत झालेल्या नवबौद्ध समाजाचे वर्तन हमीद दलवाई यथायोग्यपणे चित्रित करताना दिसतात.

कुणाच्याही अडथळ्याविना सुरू राहिलेल्या बाळासाहेब - सुली यांच्या विवाहबाह्य लैंगिक संबंधाचे 'तणकट'मध्ये लेखक जे चित्रण करतो ते पुढे रंजनाच्या पातळीवर जाताना दिसते. सवर्ण तो संबंध चवीने चघळताना दिसतात. सुलीवर त्याचा काहीही परिणाम होत नाही. लेखक तिने पूर्णपणे लाजलज्जा सोडलेली दाखवितो. 'लई हाय व्हयमाली. आता आनी वाकडा भांग पाडून बामनीनीवाणी गोल पातळात आसतीया. रांड न्हवरा सोडून श्यान खातीया आनी आसला डेबाजा. चांगल्याच्यात पडली आस्ती तर काय केलीन आस्तीन कुणास धक्कल. रांड, आमच्यातलीच आसून आमालाच नावं ठेवतीया. पोरास्नी दारातनं हाकलतीया. घाण व्हती म्हणं. वट झाला तिचा!' (पृ. १२१) आक्कवा नावाच्या दलित स्त्रीच्या तोंडी लेखक हे घालतो आणि त्यातून बदललेली सुली दाखवून देतो.

'कबीर घोरपड्याच्या घराजवळून वडर-वाड्याकडं जातानाच त्याला बाळासाहेब शेडबाळ्याची स्कूटर ओलांडून पुढं गेली. सुलीच्या दारात थांबली. नंतर बराच वेळ म्हणजे कबीर पुन्हा त्याच्याजवळ पोहचेपर्यंत तो फक्त हॉर्न वाजवत राहिला. सुली चौकटीला आली. बाळासाहेबाकडं पाहून छान छान लाजली. कबीर पाठीमागं आलाय याचा अंदाज घेतच बाळासाहेब म्हणाला,

'सुलीऽऽलोकास्नी माज चढलाय. जरासा उतराय पायजे.'

'बघा तुमास्नी जमतंय काय! न्हाईतर मी हायच' सुली चौकटीच्या बाहेर येतच बोलली.

'आगंऽऽ ह्या बाळासाहेबानं लई जनास्नी मातीत घातलयं. आनी असल्या चिलटांची काय कथा.' त्याचा आवाज उगाचच वाढला. कबीर शांतपणे सुलीचं दार ओलाडूंन पुढं गेला. मग दोघंही मोठ्यानं हसली. (पृ.२१२) असे चित्रण सर्वमान्य वाचकांना हवी असणारी गोडी आणते.

बाळासाहेब सुलीला घर बांधून देतो. त्या घरांचे कादंबरीत चित्रण येते—

'वडराच्या घरासमोर, म्हारवाड्याच्या सुरुवातीला रस्त्याला लागून सुलीचं नवं घर म्हणण्यापेक्षा टुमदार बंगला उभा होता. गावात नव्यानं

येणाऱ्या प्रत्येक माणसाला हे घर कुणाचं असेल? असा प्रश्न हमखास पडायचा. दाराला संपूर्ण सागवान. चकाकणारं पॉलिश. भिंतीला दगडीच पण डोळ्याला शांत वाटावा असा रंग. भिंतीच्या मध्यभागी 'प्रज्ञा - शील करुणा' ही अक्षरे निळ्या- तांबड्या रंगात रंगवलेली. घरातल्या सगळ्या खोल्यात मोझॅक टाइल्स. बैठकीच्या खोलीतल्या भिंतीवर बाबासाहेब आंबेडकरांचा फोटो. फोटोला चंदनाची चौकट. फोटोवर सततचा मिणमिणणारा दिवा. खोलीत आटोपशीर सोफासेट. वेताच्या तीन-चार खुर्च्या. समोर काचेचा टीपॉय. टीपॉयच्याबरोबर वर छताला बांधलेला झुंबर. खोलीच्या एका कोपऱ्यात टेबल. नक्षीदार टेबलक्लॉथ. त्यावर सुलाचा चंदनाच्या फ्रेममध्ये बसवलेला फोटो. बैठकीच्या खोलीतच सुलाच्या घराची सगळी सुखं येणाऱ्याला भुरळ घालतात.' (पृष्ठे १३७,१३८) असे अगदी घराच्या नावापासून ते आतील सजावटीपर्यंतचे सविस्तर चित्रण लेखक करतो. ते वाचल्यानंतर हे घर कुणाचे? असा प्रश्न सहजच निर्माण होतो. टीपॉय, झुंबर, टेबलक्लॉथ, सोफासेट या वस्तू घरात वापरायचे सोडाच पण साधी ही नावेही सर्वसामान्य ग्रामीण माणसाच्या अजून ओळखीची झालेली नाहीत.

या विवाहबाह्य संबंधाचा शेवट लेखक सनसनाटी घटनेने करतो. कांदबरीच्या शेवटी दलितांच्या नावावर बँकेची कर्ज काढून त्यांना फसविणारा बाळासाहेब सुलीला घेऊन पळून जातो. अविवाहित तरुण-तरुणीने पळून जावे तसे हे दोन्ही संसारी स्त्री - पुरुष पळून जातात.

'तणकट'मध्ये आलेले हे विवाहबाह्य लैंगिक संबंधाचे चित्रण एका गरीब दलित स्त्रीची विवाहबाह्य संबंध ठेवण्यापाठीमागची वेदना दाखवून न देता वाचकांचे रंजन करताना दिसते. 'वर्गी समाजात श्रमिक स्त्रीचे शोषणपीडन जसे वर्ग प्रभुत्वामुळे होते तसेच पुरुषप्रभुत्वामुळेही होते. श्रमिक पुरुषाचे दुःख एकेरी असते, तर तिचे दुहेरी. वर्गीय जातीय समाजात दलित स्त्रीच्या शोषनपीडनात भरीला जातिप्रभुत्व आहे. दलित पुरुषाचे दुःख दुहेरी असते तर तिचे तिहेरी.'[५] लेखकाने दलित स्त्रीच्या या दुःखाकडे दुर्लक्ष केले आहे. 'ग्रामीण साहित्यात भोगवस्तू म्हणून येणारे स्त्रीदर्शन वासना शमविणारे यंत्र म्हणूनच येते. प्रामुख्याने ही स्त्री बारा बलुतेदार मधीलच दिसते. दलित, आदिवासी याबरोबरच कोल्हाटी, डोंबारी, सुतार, लोहार, कुंभार, चांभार या समाजातील कोणत्याही स्त्रिया ग्रामीण साहित्यिकांच्या मानसिक वासना, प्रवृत्तीच्या बळी ठरलेल्या आहेत.'[६] भास्कर चंदनशिवे यांची ही तक्रार 'तणकट' मधील सुलीच्या पात्रनिर्मितीलासुद्धा लागू पडते.

'उत्कृष्ट कादंबरीकार अनेक व्यक्तींच्या गुणदोषांचे कमीजास्त मानाने मिश्रण तयार करून त्यापासून खऱ्या माणसाबरहुकूम अशी काल्पनिक पात्रे बनवून त्यांची योजना आपल्या कृतीत करून दाखविती.'[७] चांगल्या कादंबरीसाठी आवश्यक असणारी अशी पात्रनिर्मिती राजन गवस यांना करता आलेली नाही. सुशिक्षित आणि चळवळीत काम करणाऱ्या दलितांचे दुर्गुण दाखवून द्यायचे हे मनाशी ठरवून कादंबरीचे लेखन केले असल्याने त्यासाठी निर्माण केलेली पात्रे ही वाईट वागताना दिसणे हे अगदी सहजच आहे. त्यांचे ते वागणे दाखवून देत असताना लेखक अगदी टोकाला जाऊन त्यामध्ये भडकपणा आणताना दिसतो. त्यामुळे ही पात्रे वास्तवाधिष्ठित वाटत नाहीत. ही पात्रे पटकन् बोलतात आणि आपण काय बोलतो हेही त्यांना समजत नाही इतके त्यांना लेखक निर्बुद्ध करून टाकतो. म्हारोड्यात आलेल्या अल्तान कांबळेचा गाडीतून उतरल्याबरोबर चिखलात पाय जातो. तो म्हणतो, 'आयला सुधरायचा न्हाई म्हारोडा. साधी खडी टाकून घेता येत नाही तक्क्यासमोर साल्यांना?' (पृ.१६०) 'आंबेडकरांचे धर्मांतर' या विषयावर कॉलेजमध्ये व्याख्यानासाठी आलेल्या सत्यपाल धर्मरक्षीच्या तोंडी लेखक शिवराळ भाषा घालतो. मूळ विषयाला स्पर्श न करता धर्मरक्षी हिंदू धर्मातील ब्राह्मण - - मराठे – वाणी कसे नालायक आहेत आणि त्यांना

दलित मुलांनी ठोकले पाहिजे हे सांगतात. धर्मरक्षीच्या वागण्याबोलण्यातील नाटकीपणा, स्वभावातील भांडखोरपणा आणि विषयाचा नीट अभ्यास नाही इत्यादी दोष दाखवून देणारे हे चित्रण खूपच बटबटीत आणि उथळ झाले आहे. (पृ.३६, ३७) कादंबरीत इतर जे तीन -चार दलित प्राध्यापक येतात तेसुद्धा धर्मरक्षीसारखेच आहेत. विशेष म्हणजे या सर्व प्राध्यापकापेक्षा सवर्ण समाजातील बल्लाळ नावाच्या महाविद्यालयीन तरुणाने आंबेडकर जास्त वाचलेला असतो.

सुशिक्षित दलितांना आपल्या समाजाविषयी दुर्गंधी वाटते. ते आपल्या समाजातून दूर जाऊ पाहतात. आपलं आडनाव बदलून जात लपवू पाहतात. हे दुर्गुण काही पात्रांच्या वर्तनातून दाखवून दिले आहेत. प्राध्यापक बोधिसत्त्व वनवने आपण महार आहे हे ओळखू नये म्हणून महारांना शिव्या देत असतात. दलित असलेले पण बदललेले दीक्षित गुरुजी कबीराच्या गावी बदली होऊन आलेले असतात. ते आपल्या समाजातील आहेत हे कबीरला मित्राकडून समजते. कबीर आपल्या भावाकडून गुरुजी कुणाच्या घरी राहतात याची माहिती घेऊन त्यांना भेटायला जातो. त्यावेळी दोघांच्यामध्ये पुढील संवाद होतो.

'कबीर सोकासान्याच्या दारात पोहचला तर गुर्जी शांतपणे मिसरी घासत बसले होते. दारावर रंगवलेली नावाची पाटी होती. सिं. धो. दीक्षित. म्हणजे याचं नाव सिताराम असणार. सीताराम दीक्षित. च्या आयलाऽऽ काय बेकार वाटतं. काय म्हणून बदललं असेल यानं नाव..... त्याच्या मनात आलं. कबीर गुरुजींच्या समोर जातच म्हणाला,

'जयभीमऽऽ'

गुर्जींना ते आवडलं नसावं. त्यांनी प्रत्युत्तरच दिलं नाही. फक्त मिसरीची गुळणी तोंडात धरून 'याऽऽऽ याऽऽ' असे पुटपुले. पण त्यांच्या चेहऱ्यावर थोडासा त्रासकिपणा नकळत उमटत गेला. कबीर हे हेरूनच म्हणाला.

'राजेंद्र शिवराम कांबळे'नं सांगितलं. तुम्ही इथं आला आहात असं म्हटलं भेटावं.'

'बर झालं' गुर्जी गुळणी थुंकून बहुतेक तोंड धुवायला आत गेले. बराच वेळ कबीर एकटाच बसून राहिला. गुर्जी आले. अगदी ताजेतवाणे होऊन. मग समोरच्या खुर्चीत बसत म्हणाले,

'घर शोधण्यात आठवडा गेला. तरी तुमचे गाव बरं दिसतंय. पटकन घर मिळालं. बाकीच्या गावात आपल्या लोकांना घर देत नाहीत होऽऽ मग आपल्या वस्तीतच बघावं लागतं आणि पोरांचा प्रश्न येतो.'

'तुम्ही आडनाव दीक्षित लावल्यामुळं, असं व्हायला नको पायजे. पण कसं काय?'

'असं वाटलत मलाही. पण त्ये कुठलं. शाळेतले बाकीचे मास्तर असतातच की प्रसिद्धी करायला. त्यामुळं आडनाव बदलूनही प्रश्न सुटला नाही.'

'मग दुसरा काय तरी मार्ग काढायचा.' कबीर खोचक म्हणाला.

'काय काढणार होऽऽ मी पण भयंकर विचार करून बघितला. पण नाही सुचत. त्याचं काय हाय, आडनाव बदललं, कपडेलत्ते बदलेले तरी हे आपलं तोंड नाही ना बदलता येत. एकूण वाण बघितला की लक्षात येतंच.'

'पण तुमच्यासारख्या तोंडाचे लोक सवर्णातही आहेतच की.....'

'आहेत हो, पण ते थोडे वेगळे असतात. पण आपलं हे जरा वेगळंच आहे.' गुर्जींना आपल्या फेंदड्या नाकाचा बहुतेक भयंकर त्रास होत असावा म्हणून ते कण्हत कण्हतच बोलले.

'गुर्जीऽऽ आता प्लॅस्टिक सर्जरी निघालीय. सगळं व्यवस्थित करून देतात. बघा जमलं तर.' कबीर प्रयत्नपूर्वक गंभीर होत म्हणाला.

'त्याला पैसा दाबजोर लागतो होऽऽ सोडून टाकला विचार.' म्हणत गुर्जी पुन्हा जाग्यावरून उठले. इकडं-तिकडं फिरले. पुन्हा बसत म्हणाले,

'तुम्ही कॉलेजात राजाच्या वर्गात असता?'

'नाही. तो माझ्या वर्गात असतो.'

'म्हणजे तेच हो. मग माझं काम झालचं' गुर्जी स्वतःशी पुटपुटले. मग मोठ्यानं म्हणाले, 'मला जरा एस. वाय.बी. ए. च्या नोटस् मिळवून द्या की, काय हाय, माझा एक लांबचा पावणा बसलाय एस. वाय. ला त्याला पाहिजे होत्या.' कबीरला पुन्हा हसू आलं. त्यानं अंदाजानं पुन्हा फिरकी टाकली.

'राजा म्हणाला, तुम्हीच बसलाय'

'सांगितलं तुम्हाला त्यानं? काय माणूस? आहो, आमच्या ह्या धंद्यात एक मास्तर दुसऱ्यावर सारखा जळत असतो. त्यामुळं असल्या गोष्टी जरा चोरून कराव्या लागतात. म्हणून जराऽऽऽ पण द्याल का हो नोटस्?'

'बघू, देऊ की'

'मग मिळाल्यावर घराकडंच घेऊन या. काय हाय. मी म्हारवाड्यात आलो असतो पण कार्टी सारखी, गुर्जी गुर्जी म्हणून पाठ घेतात. आपल्या जातीतल्या मुलांना वागायचा सेन्सच नसतो. शाळेतही याचाच त्रास होतो. तरी बरं, त्या पोरांना माझी जात ठाऊक नाही. नाही तर पुन्हा त्रास. तुम्हीही सांगू नका बरं का म्हारोड्यात, विनाकारण त्रास हो.'

कबीरचं डोकं सणकलं. तरीही त्यानं प्रयत्नपूर्वक स्वतःला आवरलं, म्हणाला,

'कशाला सांगू गुर्जी? दीक्षित काय म्हार असत्यात?'

'तसं नाही हो, माझं काय चुकलं का? पण खरं ते सांगतो. आपला विकास व्हायचा असेल तर म्हारोडा सोडला पाहिजे. म्हारवाडा सोडला की जग कळतं. कसं वागावं, कसं बोलावं हेही कळाय लागतं. मग म्हारवाड्याकडं जावं असं नाही वाटतं. आनी श्यान्या माणसानं मुलं लहान असताना म्हारवाड्यात थांबू नये. वाईट संस्कार होतात त्यांच्यावर. माझ्याच मुलांचं सांगतो तुम्हाला – माझा मुलगा पहिलीत असताना दिवाळीच्या सुट्टीत गेलो घरला. तर पोरगा चार दिवसात सगळ्या म्हारकीगत शिव्या द्यायला लागला. मलासुद्धा 'रांडच्या' म्हणाला होऽऽऽ'

'बरोबरच' कबीर पुटपुटला. तसा गुर्जी काचबारून म्हणाला,

'काय म्हणाला तुम्ही?'

'काय नाही. तुमचं बरोबर आहे म्हणलो.'

'सांगतो काय? फार वाईट संस्कार होतात म्हारवाड्यात. त्यानंतर माझ्या मुलांना म्हारवाड्याचं तोंड दाखवलं नाही. आता पोरगी बारावीला हाय. तिला पास काढून दिलाय. आपल्या समाजात बायका शिकल्या पाहिजे. तर होऽऽ आमच बिऱ्हाड शिकलं नाही याचा त्रास आता मला किती व्हतोय तुम्हाला काय सांगू?' गुर्जीची टेप थांबायला तयार नव्हती. कबीरचं डोकं सारख ठणकत होत. पण अत्यंत समंजसपणे तो सारं ऐकतं होता. शेवटी म्हणाला,

'गुर्जीऽऽ तुमचा सत्कार केला पाहिजे.'

'मागच्या वर्षी होतं माझं नाव आदर्श शिक्षकांच्या यादीत. पण शेवटी वशिला कमी पडला हो' गुर्जी गंभीर झाले् आणि कबीरला स्वतःचाच राग आला. (पृष्ठे १७२, १७३)

दीर्घ पल्ल्याच्या या संवादातून दीक्षित गुरुजी या पात्राला मूर्ख आणि बावळट बनवून लेखक आपला हेतू कसा साध्य करून घेतो, हे समजते.

दलित नसलेल्या पण गावातील दलितांचा म्होरक्या असलेल्या बाळासाहेबांची दुष्कृत्ये चढत्या श्रेणीने चित्रित झाली आहेत आणि तशाच पद्धतीने बाळासाहेबाच्या मानहानीचेही चित्रण आले आहे.

डेअरीतील भ्रष्टाचारामुळे बाळासाहेब गावकऱ्यांचा मार खातो. सुलीबरोबरच्या संबंधामुळे त्याचे घरात आई आणि बायकोशी सारखे खटके उडत असतात. बायको एकेरीवर येऊन शिव्या देताना दिसते. दररोज दारू पिऊन येणाऱ्या बाळासाहेबाच्या घरातील भांडणाच्या दंग्याने सगळी गल्ली वैतागून गेलेली असते. एके दिवशी तो राग बाहेर पडतो. दारूच्या नशेत घरात भांडणाऱ्या बाळासाहेबांला गल्लीतील स्त्री-पुरुष घराबाहेर पडून शिव्या देतात. पुरुष काठीने चोपतात.

स्त्रिया चेपलीने मारतात आणि लाथा घालतात. यावर कळस म्हणजे गौरा सुतारीण चेपलीने तोंडात शेण घालते. सगळ्या गावाला झुंजविणाऱ्या बाळासाहेबांची अशी केविलवाणी अवस्थाही लेखक चित्रित करतो. असे उथळ चित्रण सर्वसामान्य वाचकांचे रंजन करायला चांगलेच उपयोगी पडते. हे पात्र पारंपारिक कादंबरीतील खलनायकाची आठवण करून देते.

दलितांचा म्होरक्या बनविलेल्या बाळा-साहेबाला लेखक लेकावळा दाखवितो. समाजात अशा कुटुंबांना सतत मानहानी, अवहेलना वाट्याला येत असते. मुलामुलींच्या विवाहाची समस्या निर्माण होते. लेखक बाळासाहेबाला लेकावळा दाखवून अशा कोणत्याही सामाजिक समस्येला हात घालताना दिसत नाही.

दुर्गुणांनी भरलेल्या सुशिक्षित दलित आणि वाया गेलेल्या तरुण दलित मुलांच्यापेक्षा एका वेगळ्या दलित तरुणाची लेखक निर्मिती करतो. कादंबरीचा नायक कबीर हा तो तरुण होय. गावातील इतर दलित मुलांच्यापेक्षा कबीर हा खूपच वेगळा आहे. समाजापासून दूर गेलेल्या सुशिक्षितांच्याबद्दल त्याच्या मनामध्ये राग आहे. त्याला हे जे चालले आहे त्याची चिंता लागून राहिली आहे, हे लेखक त्याच्या वागण्याबोलण्यातून दाखवून देण्याचा प्रयत्न करतो.

महाविद्यालय शिक्षण घेणारा हा तरुण फावल्या वेळात घरची कामे करतो. सुट्टीत शेतमजुरीला जातो. सिनेमा बघणे, हॉटेलमध्ये पैसे उधळणे यापासून तो चार हात लांब आहे. स्कॉलरशिपच्या मिळालेल्या पैशातून घरी ज्वारी आणतो. लेखकाने चित्रित केलेले व्यक्तिगत पातळीवरील त्याचे हे वागणे कौतुकास्पद आहे, हे आपण नाकारू शकत नाही. माझा खरा आक्षेप हा या पात्राचे लेखकाने जे सार्वजनिक पातळीवरील वर्तन दाखविलेले आहे. एक जागृत दलित म्हणून ते योग्य वाटत नाही. त्यामुळे होते काय तर वाईट वागणारी पात्रे जशी बेगडी वाटतात तसे चांगल्या गुणाने युक्त असलेले हे पात्रही बेगडी वाटते. शेळी बांधावर चरत गेली म्हणून किसन्या शिंद्याच्या बायकोच्या शिव्या कबीर निमूटपणे खातो. ही घटना तो आपल्या समाजातील थळू म्हाताऱ्याला सांगतो. म्हातारा ते एकून म्हणतो, 'आता कामाला जाणाऱ्या मानसास्नीबी आसलं आवखळ जनावर संगट न्हायचं म्हणजी गुडारतच. आता पयल्यासारखं कोण चरू दे तिकडं, मूक जनावर हाय, असा इच्यार करत न्हाई. आनी त्येनी तरी का करावा? डेरीच्या भोंग्यावर आमी कामावर जाणार आणि डेरीच्या भोंग्यावर परत येणार. मग कशाला त्येनी तरी शेरडू-करडू आणू देतील? तू न्हान व्हतास बाबाऽऽऽ तवा सद्या पाच-सा शेळ्या घेऊन कुणाच्याबी शेतात जायाचा. काम करता करता टमटमीत चारायचा. चर किनीटीला घराकडं येतानं कवळाभर गुलबा न्हाईत्तर पाला घेऊन यायचा. आता एक शेळीबी जड व्हयाला लागली.' (पृ.२०)

थळू आजच्या मतानुसार पूर्वी सवर्ण असे वागत नव्हते, आता वागतात. याला कारण तो आपण त्यांच्या शेतात कामाला वेळेवर जात नाही आणि गेल्यानंतर लवकर येतो हे सांगतो. थळू आजा जुन्या परंपरेतील माणूस म्हणून असे बोलतो हे ठीक आहे. पण कबीरसारख्या आजच्या शिकलेल्या तरुणाला हे विचार पटतात हे विशेष वाटते. वास्तविक त्या कामाच्या वेळी करावे लागणारे कष्ट आणि त्यातून मिळणारी मजुरी हे सुसंगत आहे का? सरकारने ठरवून दिलेल्या किमान वेतनाप्रमाणे ती मजुरी मिळते का? हे प्रश्न त्याच्या मनामध्ये निर्माण व्हायला पाहिजे होते. शेतमजुरी ही वेठबिगारीच आहे. ग्रामीण भागातील जमीनदाराकडून शेतमजुरांच्यावर होणारे अन्याय, अत्याचार ही फारच मोठी सामाजिक समस्या आहे. दलित व भूमिहीन वर्गाचे जमीनदाराकडून मोठ्या प्रमाणावर सामाजिक, आर्थिक शोषण होत आहे, असे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी सांगितले होते.[६] आणि आजही ते थांबलेले नाही. 'आजही ग्रामीण भागात खेडोपाडी गावचा बागायतदार जमीनदार दलित मजुराला जेव्हा रोज मजुरी देतो तेव्हा

तो ती मजुरी दलिताला उपकारकर्त्याच्या भावनेने देतो. दलिताला पोटाला काम देऊन जगविण्याची जगविल्याची भावना त्याच्या मनात असते. 'मी' वरच्या वर्गाचा व 'दलित' मजूर खालच्या वर्गाचा अशीच त्याची मनोभावना असते. या मनोभावनेतून जेव्हा तो दलित भूमिहीन मजुराला आपल्या शेतात काम देतो तेव्हा त्यांच्यात मालक व मजूर असे नाते निर्माण न होता जातीव्यवस्थेतील वरिष्ठ व कनिष्ठ अशी नाती निर्माण होतात. त्यामुळेच आधुनिक मजूर शास्त्रातील करारपद्धतीचे, पगाराचे, रोजंदारीच्या नियमांचे, मजुरांना मिळणाऱ्या सोयीसवलतीचे कसलेच नियम बागायतदार, जमीनदार स्वतःला लावून घेत नाही आणि त्याचे फायदेही मजूर म्हणून दलित मजुराला मिळू देत नाही. म्हणून खेड्यातील बागायतदार जमीनदार (मिनिमम वेजेस) किमान वेतनाच्या कायद्याला धाब्यावर बसवतो. मजुराला द्यावयाची मजुरी तो स्वतःच्या मर्जीप्रमाणे ठरवून देतो. कायद्याने ठरलेले किमान वेतन देत नाही.' शंकरराव खरातांनी सांगितलेले हे ग्रामीण दलित शेतमजुरांचे दुःख स्वतः दलित शेतमजुराचा मुलगा असणाऱ्या संवेदनाशील मनाच्या कबीरला समजायला पाहिजे होते. त्याच्या चार पिढ्या आक्काबाच्या शेतात राबलेल्या आहेत. त्या कामाचा तीन-चार पिढ्यापासून किती मोबदला मिळाला असेल हे कबीरच्या आजच्या खोपटाचे आणि त्यातील साहित्याचे कादंबरीत पृष्ठ ८ वर आलेल्या चित्रणातून दिसून येते. रात्र-दिवस राबूनही कबीरचे कुटुंब कमालीच्या दारिद्र्यात दिवस काढत आहे. त्यामुळे कबीरच्या मनामध्ये जमीनदाराविषयी राग निर्माण व्हायलाच पाहिजे होता. तो होताना दिसत नाही. उलट हाच कबीर कॉलेजला जाण्यासाठी आक्काबाकडून जुनी सायकल बक्षीस म्हणून स्वीकारतो. लेखक कबीरच्या मनामध्ये आक्काबाविषयी कमालीचा आदर असलेला दाखवून देतो. आक्काबाला गावाविषयी ममत्व असले तरी तो जातीयवादी आहे. आप्पुण्याला झालेल्या मारहाणीच्या प्रकरणात तो आण्णाप्पाला समजावून सांगताना म्हणतो, 'आण्णाप्पा, मी काय म्हणतोय हे ध्यानात घे. म्हारं काय आपली दुसमन न्हाईत. हे सगळं त्येनी कराय न्हाई. त्यास्नी काय कळतंय? अरंऽऽ किती केलं तर आमच्या तुकड्यावर जगणारी जात ती. कुत्रं चावलं म्हणून काय त्येला ठार मारायचं नसतं. त्यो श्यानपणा न्हवं. माझी काळ्याची पांढरी झाली म्हणून जरा ऐक. त्येंचा आमचा काय संबंध न्हाई. ती आली बांधाला तर कामाला घ्यायची. न्हाई आली न्हायली. त्यास्नी वाईट वंगाळ न्हाई बोलायचं. जरा दमानं घे. मान - आपमान तुलाच हाय आनी आमाला न्हाय असं समजू नगो. जरा शांताई घीऊन विचार कर. सांगणं माझं करतव-ऐकणं-न्हाई ऐकणं तुजं करतव. रागानं माती व्हतीया आनी धीरानं सोनं व्हतय.' (पृ. १११) आक्काबा दलितांना किती तुच्छ लेखतो याचा हा चांगला पुरावा आहे. अशा आक्काबाविषयी एक जागृत दलित तरुण म्हणून कबीरच्या मनामध्ये राग का येऊ नये?

आप्पुण्याला झालेल्या मारहाणीनंतर दलित तरुणांनी विद्रोही होणे स्वाभाविक आहे. इतर मुलांच्यात दिसणारा हा विद्रोह कबीरमध्ये मात्र दिसत नाही. या प्रकरणात लेखकाने कबीरच्या मनाचा दाखविलेला कोरडेपणा खूपच खटकतो. सवर्णांच्या शेतमजुरीला जायाचे नाही असा समाजाने घेतलेला निर्णय कबीरचे घर पाळत नाही. त्यातून गौत्याचे आणि कबीरचे भांडण होते. या भांडणात कबीर फारच आक्रमक होतो. तो गौत्याला लाथाबुक्क्या घालायला मागेपुढे बघत नाही. पुढे त्याचे आणि गावाबरोबर संघर्ष करणाऱ्या त्याच्या समाजातील मुलांचे संबंध फारच बिघडतात. त्यासाठी त्याने खबरदारी म्हणून हत्याराची जुळवाजुळव सुरू केलेली असते. आपल्या समाजातील मुलांच्या विरोधी जसा तो आक्रमण होतो तसाच महाविद्यालयातील जातीयवादी ब्राह्मण प्राध्यापकविरोधी होताना दिसतो.

गावातील सवर्णांविषयी तो नरमाईचे धोरण का स्वीकारतो याचे स्पष्टीकरण त्याच्या बोलण्यातून येते. कबीरच्या मते, ग्रामीण भागातील दलितांचे पोट सवर्णांवर अवलंबून असल्याने त्यांना न दुखवता










त्यांच्याशी चांगला संबंध ठेवणे हे दलितांच्या फायद्याचे आहे. त्याचा आणि थळू म्हातान्याच्या तोंडी लेखकाने पृष्ठ ६९ वर जो संवाद घातला आहे त्यातून कबीरचा हा विचार आपणास समजतो. फणींद्र कांबळे याच्याबरोबरच्या पुढील संवादातून कबीरची ही भूमिका अधिक स्पष्ट होते.

'सवर्णांचा राग मला येत नाही असं नाही सर....' कबीर म्हणाला, 'पण खेड्यातल्या म्हारवाड्यात जगायचं म्हणजे तुमचं हे म्हणनं मला पटत नाही. तिथं हरघडी गावातल्या माणसांच्या दारात जावं लागतयं. रोज उठून एकमेकांशी तोंड बघावी लागतात. त्यातच त्यांच्या बांधावर आमचं पोट अवलंबून असतय. तिथं तुम्ही म्हणता तसा संघर्ष उपयोगी नाही, असं माझं ठाम मत आहे.'

'खुळा आहेस तू. उलट त्याच ठिकाणी खरा संघर्ष गरजेचा आहे. शहरात आता फारसा संघर्ष करायचा गरज नाही. उलट खेड्यातच हे लोक आपल्या समाजाला अजूनही गुलामासारखं राबवून घेताहेत. त्यांच्या बांधावर आमचं पोट अवलंबून आहे. ही कमजोरी ओळखूनच ते अधिक शोषण करताहेत. त्यातून आमच्या समाजाला बाहेर काढलं पाहिजे.'

'पण यासाठी आमच्या समाजात घरपती एक दुसरा पोरगा शिकायला पाहिजे. शिकाय म्हणजे नुस्ता मॅट्रीक नापास नव्हे. तो नोकरी मिळविण्याइतपत शिकाय पाहिजेत. आमच्या म्हारोड्यात असे नोकरदार किती? तर तीन. कॉलेज शिकणारे किती? तर मी एकटा. चिक्कार पोरं अशी आहेत सर, की दहावी – बारावीला नापास होऊन म्हारोड्यात आणि तालुक्यात फिरत असतात. त्यांना घरातली म्हसरं फिरवायची लाज वाटते. कुणाच्या बांधाला जायचं तर सोडाच मग ह्या पोरांच्या पोटाला त्यांच्या आई–बापानं राबून घालावं लागतंय. अशा म्हारोड्यात तुमचा संघर्ष काय कामाचा? मला तर वाटतंय, तिथं गावकऱ्यांशी मिळतंजुळतं घेऊनच आपला समाज बाहेर काढला पाहिजे. अशी भांडणं काढून, केशीस घालून नव्हे.' कबीरला बोलता बोलता धाप लागली.

'तुला नाही कळत. तू बाबासाहेबांची सगळी पुस्तकं वाच. आपल्या समाजातल्या सगळ्या लेखकांची पुस्तकं वाच. म्हणे मी काय म्हणतोय ते कळेल. त्याशिवाय नाही कळणार. तू अशा काळात जन्मला आहेस की तुला ह्या सवर्णांची माजोरी कळत नाही. अरे, हे साले ऑफिसमध्येसुद्धा आमचा हात तांब्याला लागला तर पाणी पीत नाहीत. नोकरीवर दलित पोरगं आलं की त्याला टिकू देत नाहीत. तुझ्याच कॉलेजात परवा सिद्धार्थ नसलापुरे म्हणून आमच्या समाजातला पोरगा हजर झालाय. तर कॉलेजातले ब्राह्मण त्याच्या नावानं शंख करत वर्गावर्गातून हिंडत हिंडत बसलेत. ह्याला काय म्हणायचं? अशा लोकांना ठेचलं पाहिजे. ह्या लोकांना सतत हाणत राहिलं पाहिजे तरच हे आपल्याला जगू देतील.'

'नाही पटत सर. तुम्ही म्हणता ते सगळं असल्या शहरात. ऑफिसात ठीक असेल; पण आमच्या गावात म्हारवाड्यात हे उपयोगाचं नाही. तिथं एकदम झटपट सगळं नाही होणार. तुमचा जालिंदर बनसोडे येऊन आमचा म्हारोडा नाही बदलणार. तो उलट दारूदाठी पैसे काढून आमच्याच लोकांना खड्ड्यात घालणार. इथले पुढारी नाही कळायचेत तुम्हाला.'

'कबीर, बास झाला श्यानपणा. तुला वाटतं तू बरोबर विचार करतोस. पण तुला अजून काहीच कळत नाही. हे माझ्या लक्षात आलंय. कधी तरी होशील शहाणा आणि येशील माझ्याच विचाराला.'

'मग त्या दिवशीच बोलू सर आपण.' म्हणत कबीर रस्त्याला लागला. फणींद्र कांबळे त्याच्या झपाझप चाललेल्या आकृतीकडं नुसते बघतच उभे राहिले.

फणींद्र सर फक्त सोयीचं बोलणार' म्हणे, आंबेडकर वाच. कशासाठी? असं अर्धवटासारखं वागण्यासाठी? ह्यांचाच काय तरी घोळ होतोय. जग कुठं चाललंय? आपण कुंठ जायला पाहिजे ह्याचं भान येण्यासाठी आंबेडकर वाच आसं सांगायची हिंमत नाही यांची. उलट म्हणतात तुझचं चुकतंय. काय चुकतंय?

म्हणे मिळेल तिथं धक्का द्या. धक्का द्यायला किमान ताकद अंगात यावी म्हणून काय करणार. काय नाही तुम्ही? उगाच लागले आपले सांगायला, ठेचा म्हणे. ठेचता ठेचता ह्यात तुम्हीच संपून जाणार. हे कसं कळत नाही? सगळाच घोटाळा झालायं कुठं तरी. बाबासाहेब संमजून घेण्यातच घोटाळा झालाय. पण सांगायचं कुणी कुणाला? ऐकणार कोण? त्यापेक्षा आपण ठरवलेलंच योग्य आहे. ते लाख सांगोत.

कबीर थांबला त्याचा चेहरा बदलला. निर्णय पक्का झाल्यामुळं तो संथ चालाय लागला ...' (पृ. ११५, ११६)

या त्याच्या बोलण्यातून इतरांसारखाच कबीरला सवर्णांचा राग येतो. पण ग्रामीण भागातील दलितांचे पोट सवर्णांवर अवलंबून असल्याने संघर्ष उपयोगाचा नाही, असे कबीरला वाटते. पोटासाठी सवर्णांचा अन्याय, अत्याचार सहन करायचा का? भाकरीपेक्षा अस्मिता महत्त्वाची हा डॉ. बाबासाहेबांचा विचार कबीरपर्यंत पोहचलेला दिसत नाही. प्रत्येक घराघरामधील दलित मुलांनी चांगले शिक्षण घेऊन नोकरीला लागल्यास आपोआप गावावर अवलंबून राहण्याची गरज पडणार नाही. या कबीरच्या तोंडी लेखकाने घातलेल्या विचाराकडे एक आदर्श समाजाचे स्वप्न म्हणूनच पहावे लागेल.

दलित मुले शिकल्यानंतर त्यांना नोकरी मिळते हा विचार अगदी हास्यास्पद आहे आणि जी दलित मुले शिकत नाहीत याचा ठपका केवळ त्यांच्यावर न ठेवता त्यांच्या वाट्याला आलेल्या परिस्थितीचाही विचार करावा लागेल. कोणत्याही प्रकारची आर्थिक उत्पादनाची साधने उपलब्ध नसणाऱ्या खेड्यातील दलित तरुणांचे दुःख फारच भयानक आहे. खेड्यातील सर्व सत्ताकेंद्रापासून तो वंचित आहे. लेखक अशा मुलांच्याकडे कोणत्या भूमिकेतून पाहतो? ती मुले संवर्णांना विनाकारण त्रास देतात. सवर्णांच्या पिकांची चोरी करतात. दारू पितात.

लेखक कबीरच्या जोडीला सवर्ण समाजातील बल्लाळ या तरुण पात्राची निर्मिती करतो. कबीरचा तो वर्गमित्र असतो. या दोघांच्यामधील संवादातून प्रामुख्याने सुशिक्षित दलित आणि दलित चळवळीमधील वैगुण्य दाखवून दिली जातात. कबीरला तो म्हणतो, 'तुमचे नेते च्युतिया छाप आहेत. गंजेकर सरांनी फिल्डिंग लावली. म्हणजे केलं काय तर तुमच्या आनंदा कांबळेला पंचायत समितीचे सभापती आण्णा कित्तूरकर यांच्यामार्फत गाठलं. मग पुढचं तुला सांगाय लागतंय. तुमचा तो नवा नेता फणींद्र कांबळे जरा वळवळ करत होता म्हणे, पण त्याला त्याच्या हायस्कूलच्या मुख्याध्यापकाकडून दाबला. मग कशाला करतोय वळवळ? बाकी काही म्हण कबीर, तुमची नेते मंडळी भलती विकावू. का तुमच्या रक्तातच विकत जाण्याचा गुण असावा?' बल्लाळचा स्वर एकदम अध्यात्मिक झाला. कबीरच्या मस्तकात जाळ झाला.

'लेका, बल्या तोंड आवर' त्याच्या आवाजात आग आली. बल्लाळ कदम फक्कन हसला, म्हणाला, 'कबीर,चिडायचं नाही. जेव्हा आपण एखाद्या गोष्टीची मुळं शोधून सत्य हातात मिळवतो तेव्हा सत्याची कारणमीमांसा करताना तर्काशिवाय पर्याय नसतो.'

'सांगतो, गडबड नको. तुझ्या तालुक्यातल्या सगळ्या नेत्यांचा मी चांगला अभ्यास केलाय. तुमच्या म्हणजे तुम्ही म्हणता म्हणून तुमच्या बाबासाहेबांचं मी या भंपक नेत्यांपेक्षा अधिक वाचलंय. हे जे दलित लेखक आहेत ना, त्यांचंही वाचलंय. पण आंबेडकरांना समजून घेण्यापेक्षा स्वतःच्या तुंबड्या भरण्याचीच धडपड सगळ्यांची अधिक केलीय. मला मान्य आहे ज्यांना काही मिळालं नाही त्यांना मिळाल्यावर ते ओरबाडून खाणार. पण पोट भरल्यावर दुसऱ्याचा नसेना पण आपल्या समाजाचा तरी विचार या लोकांना का नाही सुचत? आहे उत्तर तुझ्याजवळ?'

अरे, तो कुलकर्णी मघाशी काय म्हणाला माहिताय, नसलापुरेच्या पाठीमागं एक पोरगी सोडलीय, वर्षात त्याला आमच्या संघटनेचा नेता करतो की नाही बघ. आणि तुला निश्चित सांगतो. नसलापुरे त्याच्या

संघटनेचा नेता होणार आणि तुझ्याविरुद्ध लढायला उभा राहाणार? हे मी भविष्य नाही सांगत, वस्तुस्थिती सांगतोय.' (पृ. १३५)

जातिवंत हुशार असणारा हा बल्लाळ दलित नेत्यांना चांगले ओळखतो. त्यांची वैगुण्य दाखवितो. आपणाला शिकविणाऱ्या दलित प्राध्यापकांचा तो एकेरी उल्लेख करतो. दलित नेते मंडळी आणि प्राध्यापकांपेक्षाही त्याने आंबेडकर जास्त वाचला आहे. दलित साहित्य जास्त वाचले आहे. त्यामध्ये त्याने काय काय वाचले आहे? या प्रश्नाचे उत्तर कादंबरीत मिळत नाही.

कबीरला बल्लाळ म्हणतो, 'आपण कुणीही जग सुधरायचं कॉन्ट्रॅक्ट घेतलेलं नाही. का म्हणशील तर ती आपली ऐपत नाही आणि आज परिस्थितीही तशी नाही. बाबासाहेबांचं ठीक होतं रे. त्यांच्यावेळी सगळे तुमच्या समाजातले अडाणी होते. म्हणजे शुद्ध गुलाम होते आणि सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे त्यावेळी सर्वत्र गांधीजी होते. त्यांचा लोकांच्या मनावर जोरदार पगडा होता. त्यामुळेच बऱ्या वायटाची धास्ती होती. म्हणून बाबासाहेब तुमच्या समाजासाठी एवढं करू शकले. आज तेच बाबासाहेब असते तर त्यांना पुन्हा पुन्हा मार खावा लागला असता, नव्हे त्यांचं डोकं औट झालं असतं. त्यामुळं तुम्ही म्हणजे तुमची दलित लेखक मंडळी गांधींना कितीही वाईट म्हणत असले तरी बाबासाहेबांच्या संपूर्ण कर्तृत्त्वाला गांधींच्या आणि फुलेंच्या कार्याची पार्श्वभूमी आहे, हे विसरता कामा नये.' (पृ. २०४)

अठरा-वीस वर्ष वयाचा महाविद्यालयीन तरुण हे बोलतो याचे आश्चर्य वाटल्यावाचून राहत नाही. विशेष म्हणजे, दलित समाजाच्या संदर्भात गांधी-आंबेडकर यांच्या वैचारिक भूमिकेविषयी महाविद्यालयीन तरुण बोलतो आणि ज्यांना त्याविषयी बोलायचा अधिकार आहे त्या दलित प्राध्यापकांचे वर्तन मात्र हास्यास्पद झाले आहे.

कादंबरीतील ग्रामीण समाजातील सवर्ण पात्रांची दलितांच्याकडे बघण्याची भूमिका परंपरावादी आहे. ते अस्पृश्यतेचे पालन करताना दिसतात. केवळ साध्या कारणानेही दलितांना मारहाण करण्यामध्ये त्यांना काही गैर वाटत नाही. त्यांचे हे अमानवीय वर्तन माणुसकीला काळीमा फासणारे आहे हे पटवून द्यायला पाहिजे होते. पण ते दिले जात नाही. आक्काबा राणेसारख्या जातीयवादी जमिनदाराच्या पात्राला भव्य आणि उदात्तपणा प्राप्त करून दिला आहे.

कादंबरीत आलेली जुन्या विचारसरणीची दलित पात्रे लेखकाच्या सनातनी विचारसरणीचे वाहक म्हणून आपली जबाबदारी निभावून नेताना दिसतात. ती सवर्णांचा मार निमूटपणे खातात. त्याच्या वेदना त्यांना होत नाहीत. म्हणूनच ती मार खाणाऱ्याकडून मदत स्वीकारतात. आणि मारणाऱ्याला पोलिसांनी पकडून नेले म्हणून घाबरतात. गावच्या पांढरीवर त्यांची गाढ श्रद्धा आहे. त्या श्रद्धेवरच ती जगतात. सित्या दिवळीतील कपातून आनंदाने चहा पितो. शेतामध्ये सवर्णांकडील आंबील पिण्यासाठी आक्कावाला पळसाच्या पानाचा द्रोण करावा लागतो. सवर्णांनी आपल्या भांड्यातून दिली नाही याचे शल्य बोचण्याऐवजी आंबीलने तिचा जीव शांत होतो. आसपासच्या गावातील जत्रेत मटणाचे शिळे सांबार मागायला जायला म्हारोड्यातील स्त्रियांना आनंद वाटतो. खळी मागून धान्य गोळा करणाऱ्या दलितांना वर्षभर पुरेल एवढे धान्य मिळते.

असा गावगाड्यात दलित समाज भरडला जात नसून सुखासमाधानाने राहत होता हे दाखवून दिले आहे आणि ज्या लाचार आगतिक जगण्याला बाबासाहेबांनी कडाडून विरोध केला होता त्याचे उदात्तीकरण केले आहे.

प्रबोधनकार ठाकरे यांनी १९३३ साली 'खरा ब्राह्मण' नावाचे नाटक लिहिले आहे. या नाटकात त्यांनी स्वतःच्या पायरीने वागणारा जुन्या विचारसरणीचा विठू महार दाखवून दिला आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी त्याविषयी जनता पत्रामध्ये 'नाटककरांनी

चालविलेले अस्पृश्यता निवारण' या नावाचा एक लेख लिहून त्याविरोधी आपली भूमिका सविस्तरपणे विषद केली आहे. त्यात ते म्हणतात, 'विठू महाराच्याद्वारे नाटककर्त्याने अस्पृश्यांचा प्रश्न जनतेपुढे या नाटकात मांडला आहे. विठू महार हा दीन आहे, दुबळा आहे. त्याला तम नाही, दम नाही. आपल्याला लोक अस्पृश्य मानतात याचे त्याला वाईट वाटते पण माणसांसारखा माणूस असताना आपल्याला अस्पृश्य का मानावे याची त्याला भावना नाही व आपल्याला अस्पृश्य मानतात याची त्याला चीड नाही. त्याला मारणाऱ्यावर तो हात उचलीत नाही. शिव्या देणाऱ्यांची जीभ उपटीत नाही. अशा या मातीच्या मढ्यापासून अस्पृश्यता निवारण्याचा प्रश्न कसा उद्‌भवू शकतो. याचा आम्हास मोठा अचंबा वाटतो. जो विठू गावकऱ्यांच्या जोड्यात वागायला तयार असतो. गिरजा त्याला शिवू लागली असताना मला शिवू नको म्हणून दूर होतो. गावातील लोकांनी कितीही अन्यायाने वागविले तरी त्याचा मनक्षोभ न होता आपल्या सेवाधर्मानुसार गावातील मेलेली ढोरे ओढण्यास सिद्ध असतो, अशा ह्या विठू महाराचा काही प्रश्न आहे असे कोणाला तरी वाटेल का?'[७]

जातीयवादी सवर्णांपुढे नमते घेऊन स्वतःच्या पायरीने वागणाऱ्या जुन्या विचारसरणीला बाबासाहेबांचा किती प्रखर विरोध होता, हे त्यांच्या वरील विचारातून स्पष्ट होते. आज त्यानंतर साठ-सत्तर वर्षांनी 'तणकट' मध्ये विठू महारासारखे वर्तन असणाऱ्या पात्रांचे चित्रण करून खेडेगाव शाबूत राहण्यासाठी अशा दलित स्वभावाची निकड व्यक्त केली गेली आहे.

गावगाड्यासंबंधी लेखकाची ही भूमिका कादंबरीच्या शेवटी बल्लाळच्या तोंडी घातलेल्या पुढील विचारातून अधिक स्पष्ट होते–

'आणि मुद्दा उरतो तुझा म्हारवाडा वाचवण्याचा आणि वाचण्याचा. तो वाचेल. त्याच्या स्वतःच्या हिमतीवर तगेल. तगणे हा तर आपल्या कृषी संस्कृतीचा अद्वितीय वारसा आहे आणि म्हारवाडा मातीला जवळचा आहे. वास्तविक तुमच्या तमाम नेत्यांनी हेच पहिल्यांदा ध्यानात घ्यायला हवं होतं की हा देश खेड्यांचा आहे आणि म्हारवाड्याची सगळी मुळं खेड्यातल्या जमिनीत आहेत. तेच विसरले सगळे आणि बोलत राहिले. मध्यमवर्गीय ब्राह्मणी क्रांतीचे जाहीरनामे, मग घोषणा, मोर्चे, उपोषणं आणि वळवळ. चळवळ. सगळं शहरातल्या रस्त्यावर आणि वर्तमानपत्रातल्या कागदावर त्याचा कधी संबंधच आला नाही तुझ्या म्हारवाड्याशी. वास्तविक ते इथलेच. पण शहरात पडले. कवितातून रडले. मग त्यांचेही मध्यमवर्गीय होणे अटळ होते. ते त्यांना लाभलेल्या गतीने होत गेले आणि मगच झाला तुझ्या नव्या दुःखाचा जन्म!' (पृ. २३८)

दलित नेते शहरात पडले, कवितातून रडले आणि त्यांचे मध्यमवर्गीय झाल्याने कबीरच्या नव्या दुःखाचा जन्म झाला असे विचित्रच काहीतरी बल्लाळच्या तोंडी घातले आहे. हे नवे दुःख कोणते? कसा गमतीदार प्रश्न सहजच निर्माण होतो. वस्तुतः दलितांनी शहरात जाऊन राहणे आणि त्यांचे मध्यमवर्गीय होणे यामध्ये काहीही वाईट नाही. डॉ. बाबासाहेबांनी आपल्या दलित बांधवांना 'शहराकडे चला' असे आव्हान केलेच होते. त्यांच्या मते, 'जोपर्यंत ते खेडी सोडून शहरात राहायला येणार नाहीत तोपर्यंत त्यांच्या जीवनस्थितीत सुधारणा होणार नाही. खेड्यात राहणाऱ्या या आमच्या अस्पृश्यांना वाडवडिलांच्या गावी राहण्याचा मोह सुटत नाही. त्यांना वाटते, तेथे आपली भाकरी आहे. परंतू भाकरीपेक्षा स्वाभिमानाला अधिक महत्त्व आहे. ज्या गावी कुत्र्यासारखे वागले जाते, ज्या ठिकाणी पदोपदी मानभंग होतो, जेथे अपमानाचे स्वाभिमानशून्य जीवन जगावे लागते ते गाव काय कामाचे?'[८]

बाबासाहेब आंबेडकरांच्या या विचाराविरोधी भूमिका घेऊन महारवाडा मातीला जवळचा आहे आणि त्याची सगळी मुळं खेड्यातल्या जमिनीत आहेत असे बोलणे म्हणजे परंपरागत सनातनी व्यवस्था उचलून धरणे होय. अशोक बाबर यांना मात्र तो एक चांगला देशीवादी विचार वाटतो. त्याच्या समर्थनार्थ ते


अनुक्रमणिका

आंबेडकरी विचाराची गल्लत करताना दिसतात. त्यांच्या मते, 'आंबेडकरांनी 'शहराकडे चला' असे तात्कालिक आवाहन केले असले तरी खेडी सुधारा हे गांधींचे आवाहन आंबेडकरांना मान्य नव्हते, असे म्हणता येणार नाही. जगभराच्या अर्थनीतीचा अभ्यास करणाऱ्या आंबेडकरांना भारत हा खेड्यांनी बनलेला देश आहे, हे चांगले माहीत होते. आंबेडकरांनीसुद्धा आर्थिक विकेंद्रीकरणाचाच विचार मांडला आहे. शहरात जाऊन पोटभरू मध्यमवर्गीय व्हा, असे त्यांनी सांगितले नव्हते. सगळेच दलित शहरात जाऊ शकणार नाहीत, हेही आंबेडकरांना चांगले माहीत होते. मग उरल्यासुरल्या खेड्यातल्या दलितांना गांधीवादीच होणे भाग पडते हे विसरता कामा नये.'[१२]

खरे तर ग्रामव्यवस्थेविषयी गांधीजी आणि आंबेडकर यांच्यामध्ये खूप मतभिन्नता होती. 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि महात्मा गांधी' या लेखामध्ये वसंत पळशीकर यांनी दोघा महापुरुषांच्या ग्रामव्यवस्थेकडे बघण्याचा वेगवेगळ्या भूमिका स्पष्ट करून या मुद्यावरून गांधी व आंबेडकर यांचे फक्त विळ्याभोपळ्याचेच सख्य जुळून येणे शक्य होते, असे स्पष्टपणे सांगितले आहे.[१३]

एकूण या कादंबरीत दलित चळवळीचे आणि सुशिक्षित दलितांचे दुर्गुण दाखवून देण्यासाठी भडक, अवास्तव घटनाप्रसंग घातलेले आहेत. तशाच प्रकारची पात्रनिर्मिती आहे आणि कादंबरीतून व्यक्त होणारी मूल्यदृष्टी ही गावगाड्यील पारंपरिक सनातनी मूल्यव्यवस्था उचलून धरणारी आहे. त्यामुळे ही कादंबरी ग्रामीण भागातील दलित – सवर्ण संबंधाचे यथायोग्य चित्रण करण्यामध्ये आणि दलितांच्या कोणत्याही प्रश्नाच्या मुळापर्यंत जाण्यामध्ये अपयशी ठरली आहे.



**संदर्भ —**

१. पवार गो. मा. - 'दलित साहित्य प्रवाह आणि प्रतिक्रिया', संकलन व संपादन — गो. म. कुलकर्णी, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, द्वितीय आवृत्ती १९७७, मुलाखत, पृ. १३०.

२. पठारे रंगनाथ - 'मराठी कादंबरीचे भवितव्य', 'गेल्या अर्धशतकातील मराठी कादंबरी', संपा. विलास खोले, लोकवाङ्मय गृह, मुंबई, २००२, पृ. २४०.

३. कोत्तापल्ले नागनाथ - 'गेल्या शतकातील ग्रामीण व प्रादेशिक कादंबरीचे यशापयश' 'गेल्या अर्धशतकातील मराठी कादंबरी', उनि., पृ. १६५.

४. बाबर अशोक - 'देशीवाद', साकेत प्रकाशन पुणे, २००५, पृष्ठे २२२, २२३.

५. पाटील शरद - 'अब्राह्मणी साहित्याचे सौंदर्यशास्त्र', सुगावा प्रकाशन, पुणे, १९८८, पृ. १५.

६. चंदनशिव भास्कर - 'भूमी आणि भूमिका', साकेत प्रकाशन, औरंगाबाद, १९९२, पृ. ६९.

७. हस्तक उषा - 'कादंबरी आणि मराठी कादंबरी', साहित्य सेवा प्रकाशन, औरंगाबाद, १९९३ पृ. १०७.

८. तुपे सु. दा. - 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि जमीनधारणा', डॉ. बाबासाहेब आंबेडकर गौरवग्रंथ, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, पुनर्मुद्रण १९९९, पृ. ४०२.

९. खरात शंकरराव - 'पद-दलितांचा-अस्पृश्यांचा मुक्तिसंग्राम', इंद्रायणी साहित्य, पुणे, २००३, पृ. २३०.

१०. आंबेडकर बाबासाहेब - 'जनता पत्रातील लेख, संपादक अरुण कांबळे, पॉप्युलर आणि मुंबई विद्यापीठ, मराठी विभाग, मुंबई, १९९२, पृष्ठे, ४४, ४५.

११. लोखंडे भाऊ - 'आंबेडकरी क्रांतीचे सिहावलोकन', लोकराज्य, ऑक्टो २००६, पृ. १५ वरून उद्धृत.

१२. बाबर अशोक - 'देशीवाद', उनि., पृ. २२०.

१३. पळशीकर वसंत - 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि महात्मा गांधी', निवडक साधना ग्रंथ संच : खंड ५, संपा. ग. प्र. प्रधान, रा. ग. जाधव, साधना प्रकाशन, पुणे, २००५, पृ. ८०.








## काल, आज आणि उद्या

# मनुष्यजातीचा जगभर झालेला फैलाव

साक्षी

आफ्रिकेचे ईशान्येकडील टोक आणि अरबस्थानाचे नैर्ऋत्येकडील टोक यांच्या दरम्यान चिंचोळी सामुद्रधुनी आहे. आज तिला आपण नान-एल्-मांदेबची सामुद्रधुनी असे म्हणतो. तांबड्या समुद्राचे हे दक्षिणेकडील टोक होय. सुमारे पन्नास हजार वर्षांपूर्वी या सामुद्रधुनीच्या आफ्रिकेकडील अंगाला मोठी धामधूम उडून गेली होती. काही हजार रानटी माणसे समुद्राकडे तोंड करून उभी होती. झाडांच्या खोडातील काही भाग उकरून काढून तयार केलेल्या ओबड-धोबड होड्या किनाऱ्यावर उभ्या केल्या होत्या. या होड्यातून ती माणसे सामुद्रधुनी ओलांडून आशिया खंडात उतरणार होती. एकदा समुद्र पार केल्यावर ही माणसावळ परत फिरणार नव्हती. नाना दिशांनी आणि मार्गांनी ती जगभर पसरणार होती व अनेक युगांनंतर ती परग्रहावरही जाणार होती!

आज आपण ज्याला 'केनया' म्हणून ओळखतो त्या भूभागात बुद्धिशाली मनुष्य (होमो सेपियन) याचा अवतार झाला. आधुनिक मनुष्याची शरीरयष्टी, वर्तणूक, स्वभाव, भाषा यांची पाळेमुळे आपल्याला ह्या माणसापर्यंत नेऊन भिडविता येतात. याच मनुष्याला केवळ इतर सस्तन प्राण्यांपेक्षाच नव्हे तर उत्क्रांतीच्या आधीच्या टप्प्यावरील मनुष्यसदृश प्राण्यांपेक्षाही मोठा व शक्तीशाली मेंदू लाभला होता. त्या मेंदूच्या सहाय्याने या माणसाने भाषा रचली होती. धारदार दगड, त्यांचा उपयोग करून घडविलेल्या टोकदार काठ्या अशा शस्त्रांचा उपयोग करून स्वत:चे संरक्षण करण्याचे कौशल्य त्याने अंगी बाणवले होते. मारलेल्या जनावरांचे कातडे अंगाभोवती लपेटून तो थंडीचे निवारण करू शकत होता. मानवसदृश प्राण्यांची नाके बसकट व फेंदारलेली असत; पण याचे नाक उंच व टोकदार होते. हा ताठ उभा राहू शकत होता.

स्वत:चे रक्षण करण्याची हिकमत अंगी असल्यामुळे या माणसांची संख्या त्यांच्या मूळच्या ठिकाणी पुष्कळच वाढली होती व परिणामी पोट भरण्याची चिंता निर्माण झाली होती. आसपासच्या झाडांवर फळे उरली नव्हती; हरणे, ससे अशा चपळ प्राण्यांची शिकार करणे आधीच अवघड पण आता तेही मुबलक राहिले नव्हते; तळ्यातले मासे संपले होते. अन्नासाठी आपसात भांडण्यापेक्षा इथून बाहेर पडलेले बरे, असे ठरवून माणसांची टोळी आपल्या ठिकाणाहून नवीन घरठाव करण्यासाठी बाहेर पडली. उत्तरेकडे चालू लागली. त्यातलीच काही माणसे आता तांबड्या समुद्राच्या किनाऱ्यावर उभी राहून समुद्राच्या पल्याडच्या जमिनीकडे निरखून पाहात होती.

### (१)

हा बुद्धिशाली मनुष्य जगभर कोणत्या मार्गाने व कोणत्या काळात पसरला याचा एक नकाशाच आदिमानव-शास्त्रज्ञांनी तयार केला आहे. त्याचे स्थूलमानाने वर्णन खालीलप्रमाणे करता येईल.

(अ) मूलस्थानापासून सुमारे ६० हजार वर्षांपूर्वी माणूस निघाला व तो प्रथम आफ्रिकेच्या दक्षिण भागात पोचला.

(आ) पन्नास हजार वर्षांपूर्वी माणसांच्या दोन टोळ्या मूलस्थानाहून निघाल्या व एक टोळी आफ्रिकेच्या पश्चिम प्रदेशात गेली. दुसरी टोळी उत्तरेकडे जाऊन बाब-एल-मांदेबच्या सामुद्रधुनीपाशी पोचली. या दुसऱ्या टोळीला आपण 'पूर्व टोळी' असे म्हणू.

(इ) या पूर्व टोळी'तली माणसे (त्यांचे वंशज) आजच्या अरबस्थानातून क्रमाक्रमाने हिंदुस्थानात आले व तेथून मजल-दर-मजल मलेशियात पोचले. इथे या टोळीतील लोकांच्यात फाटाफूट झाली. 'पूर्व(१) टोळी' आग्नेयेकडे निघाली व ऑस्ट्रेलियात पोचली तर 'पूर्व(२) टोळी' ईशान्येकडे गेली. ती रशियाच्या अतिपूर्व भागात जाऊन तेथून अलास्कात उतरली. उत्तर अमेरिकेच्या पश्चिम भागात तिने वस्ती केली.








या पूर्व (२) टोळीतील एक गट कोरियाला उत्तरेकडून वळण घालून दक्षिणेला चीनमध्ये शिरला व तेथे त्याने वस्ती केली.

(ई) पूर्व टोळीतील काही माणसे अरबस्थानातच ५००० वर्षे थांबली व नंतर त्यांच्यापैकी काही माणसे आणखी उत्तरेकडे सरकून आताच्या जॉर्डन या देशात येऊन राहिली. तेथून त्यांच्यापैकी निरनिराळ्या टोळ्या पश्चिमेकडे आफ्रिकेचा उत्तर किनारा व युरोप या भागात अनुक्रमे दहा हजार व २५ हजार वर्षांपूर्वी गेल्या.

(ड) जॉर्डनमध्ये वस्ती करून राहिलेल्या लोकांपैकीच एक गट ४० हजार वर्षापूर्वी पूर्वेकडे जाऊन आताच्या ताजिकिस्तानात गेला. त्यांच्यापैकी एक टोळी उत्तरेला जाऊन कझागिस्तानच्या उत्तर सीमेवर जाऊन पोचली ही गोष्ट ३५,००० वर्षापूर्वी झाली.

(ऊ) या ठिकाणाहून एक टोळी २० हजार वर्षांपूर्वी निघाली ती पूर्वेकडे रशिया ओलांडून अलास्कात गेली. तेथून दहा हजार वर्षांपूर्वी काही माणसे उत्तर अमेरिकेला तुडवीत मेक्सिकोतून दक्षिण अमेरिकेत जाऊन पसरली.

(ए) ताझिकिस्तानात जाऊन पोचलेल्या माणसांपैकीच काही माणसे पश्चिमेकडे वळली व उत्तर युरोप आणि स्वीडन इथे पसरली. ही गोष्ट दहा हजार वर्षांपूर्वीची.

(ऐ) कझागिस्तानाच्या उत्तर सीमेवर राहिलेल्या माणसांचे काही जथ्थे ३० हजार वर्षांपूर्वी युरोपातून पुढे जात स्पेनपर्यंत पोचले.

आदिमानवशास्त्रज्ञांनी अशा रीतीने, आफ्रिकेत जन्मलेल्या बुद्धिशाली मनुष्याने ६० हजार वर्षांपूर्वी अरबस्थानात ठाणे दिल्यानंतर पुढच्या पन्नास हजार वर्षात सारे जग कशा पद्धतीने व्यापून टाकले याचा तपशिलवार नकाशा तयार केला आहे. तो नकाशा आम्ही इथे दिला आहे. सारांश, १० हजार वर्षांपूर्वी अशी स्थिती झाली की, जगाच्या पाठीवरील सर्व खंडात व भूभागात मनुष्याची वस्ती पोचली.

(२)

इथे असे प्रश्न सहजच उद्‌भवतात की, हा सगळा कल्पनेचा खेळ आहे की, याला काही पुरावा आहे? आपण माणसांच्या स्थलांतराचे पुरावे सहसा उत्खननात सापडणाऱ्या अवशेषांवरून मिळवतो. मोहंजोदरो-हडप्पा येथील संस्कृती महाराष्ट्रातील इनामगावापर्यंत पोचली होती हे मोहंजोदरो-हडप्पा येथे सापडलेले अवशेष आणि इनामगावाच्या उत्खननात सापडलेले अवशेष यांच्या तुलनेवरून आपल्याला कळले. मनुष्य केनयात उत्पन्न झाला व दहा हजार वर्षांपूर्वी तो दक्षिण अमेरिकेच्या पार दक्षिण टोकाला पोचला हे ठरविण्यासाठी असा काही निर्णायक पुरावा हाती लागला आहे का?

असेही असण्याची शक्यता नाही का, की बुद्धिशाली मनुष्य जगाच्या पाठीवर ठिकठिकाणी निर्माण झाला व मागून, हजारो वर्षांनी, आपण सगळे एकत्र आहोत याची समज माणसाला आली? बरे, उत्क्रांतीचे काय? निअँडरथल मनुष्य, ताठ चालणारा मनुष्य (होमो इरेक्टस) असे मनुष्यसदृश प्राणी आपल्याला अवशेष रूपाने सापडले आहेत. त्यांच्या पासूनच उत्क्रान्त होत बुद्धिशाली मनुष्य अवतरला अशी आपली समजूत होती. पण त्यांचा किंवा त्यांच्याशी असलेल्या बुद्धिशाली मनुष्याच्या नात्याचा काहीच संदर्भ या नकाशात कसा आला नाही?

या प्रश्नांचे एक उत्तर असे की, आपण ज्या स्थलांतरणाविषयी बोलत आहोत ती स्थलांतरणे कमीत कमी १०,००० वर्षांपूर्वी घडलेली आहेत. या उलट मोहंजोदरो-हडप्पा ही संस्कृती ३००० वर्षापूर्वीची आहे. मोहंजोदरो-हडप्पा येथील अवशेष जसे व ज्या प्रमाणात सापडतात त्या प्रमाणात इतक्या जुन्या काळातले अवशेष सापडतील अशी अपेक्षा करणे व्यर्थ आहे. याचा अर्थ असा नाही की, या जुन्या स्थलांतरणाचे वस्तुरूप अवशेष अगदीच आढळत नाहीत; पण ते फारच थोड्या प्रमाणात. मग, शास्त्रज्ञांनी या प्रागैतिहासिक स्थलांतरणाचा अंदाज कशाच्या सहाय्याने बसविला? याचे उत्तर असे की, गेल्या अर्धशतकात 'तौलनिक-जनुक-शास्त्र' (तौजशा) असे नवेच विज्ञान शास्त्रज्ञांनी घडविले आहे; त्याचा उपयोग करून व पृथ्वीच्या पाठीवरील ठिकठिकाणच्या मनुष्य समूहातील जनुकांची तुलना करून शास्त्रज्ञांनी या प्राचीन स्थलांतरणाचा माग


अनुक्रमणिका

काढला आहे. हे शास्त्र अगदी नवीन व बरेच क्लिष्ट असल्याने त्याची स्थूलमानाने ओळख करून घेऊ.

मनुष्याच्या (किंवा कोणत्याही प्राण्याच्या) पेशीमध्ये डीएन्ए नावाचा रेणू (मोलेक्यूल) असतो इथून आपण सुरुवात करू. डीएन्ए ही निरनिराळ्या तुकड्यांची एक रांग असते; या तुकड्याला न्युक्लिओटाईड असे म्हणतात. प्रत्येक न्युक्लिओटाईड मध्ये (इतर रसायनांबरोबर) एक मूलभूत द्रव्य (बेस) असते. हे द्रव्य चार प्रकारांचे असते व हे प्रकार, त्यांच्या नावाच्या आद्याक्षरांवरून C, A, G, T या चार अक्षरांनी ओळखली जातात. अधिक सुलभीकरण म्हणून आपण असे धरून चालू की, एक डीएन्ए म्हणजे C, A, G, T या अक्षरांची रांगच होय. उदा. T, C, C, G, A, G, T, C, G, G, T, A, C, A.... वगैरे. एका डीएन्ए मध्ये तीनशे कोटी न्युक्लिआटाईड्स् असतात हे लक्षात घेतले म्हणजे ही अक्षराची रांग किती लांब होईल याची कल्पना येईल. साहजिकच अशी संपूर्ण रांग तपासणे व त्यातील अक्षरांचे घाट (पॅटर्न्स) शोधून काढणे ही त्रासाची गोष्ट असते. त्यामुळे संपूर्ण डीएन्ए तपासण्यापेक्षा त्याचे काही भाग तपासण्यावरच समाधान मानावे लागते.

दोन मनुष्य-व्यक्तींचे डीएन्ए घेतले व त्यांचे न्युक्लिओटाईड्स् क्रमाने एकास एक असे ताडून पाहिले तर ९९.९% न्युक्लिओटाईड्स परस्परांशी जुळतात. फरक आढळतो तो फक्त ०.१% म्हणजे ३० लाख न्युक्लिओटाईड्स् मध्ये. हे फरक (म्युटेशन्स) निरनिराळ्या प्रकारचे असतात. त्यापैकी काही प्रकार असे :

(अ) समजा चार व्यक्तींचे डीएन्ए खालीलप्रमाणे आहेत.

i)TCC GAG TCG GTA CA....
ii)TCC GAG TCG GTA CA....
iii)TCⓉ GAG TCG GTA CA....
iv)TCⓒ GAG TCA GTA CA....

इथे वर्तुळ करून दाखविलेली अक्षरे डीएन्ए च्या घाटात (पॅटर्न) न बसणारी आहेत. असा जो फरक दिसून येतो त्याला एक स्थानीय बहुरूपता (एस्थान) असे म्हणतात.

(आ) काही डीएन्एच्या बाबतीत एस्थानचा विचार न करता न्युक्लिओटाईड्स्च्या आवृत्त होणाऱ्या गटांचा विचार करावा लागतो. अशा गटांना सूक्ष्म-उप-जनुक (मायक्रो सॅटेलाईट्स्) असे म्हणतात. त्याचे चित्र, उदाहरणार्थ, खालीलप्रमाणे दाखविता येईल.

i)C [AGT] [AGT] [AGT] [AGT] G....
└── सूक्ष्म-उप-जनुक पाच आवृत्त्या.

ii)C [AGT] [AGT] [AGT] GT.....
└── सूक्ष्म-उप-जनुक तीन आवृत्त्या.

(इ) काही डीएन्ए च्या बाबतीत असेही आढळून येते की, ओळीने लाखो न्युक्लिओटाईड्स् असणारी एक पट्टीच्या पट्टी गळून पडलेली असते किंवा वाढवून आलेली असते. उदाहरणार्थ खालील स्थिती पहा.

१. |——||——||—||——||——|

मूळ किंवा प्रमाण डीएन्ए मधील न्युक्लिओटाईड्स्च्या पट्ट्या.

२. |——||——|     |——||——|

एक पट्टी गळाली आहे.

३. |——||——||——||——||——||——|

एक पट्टी वाढवून आली आहे.

फरकांचा असा जो प्रकार आहे त्याला 'प्रतीच्या संख्येतील बदल' असे म्हणतात.

हिंदुस्थानातील मनुष्यांच्या डीएन्एमध्ये न्युक्लिओटाईड्स्चा जो घाट (पॅटर्न) असतो त्याच्यापेक्षा अंदमानातील मनुष्यांच्या डीएन्ए मधील न्युक्लिओ-टाईड्सचा घाट थोडा निराळा असतो. हा घाट म्हणजे त्या मनुष्य-समूहाची खूणच होय. 'सूक्ष्म-उप-जनुक' ही अशा तऱ्हेच्या खुणांपैकी एक महत्त्वाची खूण म्हणून शास्त्रज्ञांनी अनेक वर्षे वापरली. डीएन्एच्या घाटातील या निरनिराळ्या बदलांचा अभ्यास करून शास्त्रज्ञांनी आदिमानवाच्या स्थलांतरणाचा कसा मागोवा घेतला ते आता पाहायचे आहे.

(३)

डीएन्एचे विश्लेषण करून बुद्धिशाली मनुष्याच्या उगमाचा छडा लावण्याच्या उपक्रमाला सुमारे वीस वर्षांपूर्वी सुरुवात झाली. त्यावेळी डीएन्एचा






अभ्यास करण्याची साधने पुरेशी विकास पावली नव्हती. १९८७ साली रिबेक्का कान व ॲलन विल्सन यांनी आपले संशोधन एका शोधनिबंधाच्या द्वारे प्रसिद्ध केले होते. मनुष्याच्या पेशींमध्ये मिटोचोंड्रियन नावाचा अवयव असतो. पेशीला लागणारी ऊर्जा तयार करणे हे या अवयवाचे काम असते. या अवयवाचा विशेष असा की हा मातेकडून अपत्याकडे आलेला अवयव असतो. थोडक्यात, या अवयवात असलेल्या डीएन्एच्या घडणीत पित्याच्या डीएन्एचा संस्कार उतरलेला नसतो. साहजिकच या डीएन्एची दुसऱ्या व्यक्तीच्या अशाच प्रकारच्या डीएन्एशी तुलना केली असता या दोघांची कोणी एकच स्त्रीपूर्वज होती का, याचा तपास लावणे शक्य होते. कान व विल्सन यांनी निरनिराळ्या मनुष्य समूहातील व्यक्ती घेतल्या. (उदा. भारतीय, चिनी, तुर्की, फ्रेंच इ.) त्यांच्या मिटोचोंड्रियन मधील डीएन्ए घेऊन तपासले. त्यांच्यातील फरक कशा प्रकारचे आहेत हे शोधले व असा निष्कर्ष काढला की सर्व माणसांची एकच आदिमाता होती.[१] दोन लाख वर्षापूर्वी ती आफ्रिकेत राहात होती. हे सर्व कसे जमले?

मिटोचोंड्रियनमधील डीएन्ए मध्ये फक्त १६,००० न्युक्लिओटाईड्स् असतात. त्यामुळे १९८७ साली देखील संपूर्ण डीएन्ए मध्ये (वरील भाग (२) मध्ये वर्णिलेले) पडलेले फरक तपासणे शक्य होते. तसेच दोन निरनिराळ्या व्यक्तींच्या मिटोचोंड्रियनमधील डीएन्एत असलेल्या फरकावरून (म्युटेशन्स) काळाच्या ओघात कोणत्या व्यक्तीचा मनुष्य-समूह आधीचा व किती आधीचा हेही ठरविता येते. किंबहुना मिटोचोंड्रियन हा स्वतः एक रेणवीय घडयाळच असतो म्हणाना. मिटोचोंड्रियन मधील डीएन्एच्या तपासणीतून आपल्याला मनुष्यसमूहांचा वंशवृक्षच तयार करता येतो.

मिटोचोंड्रियन मधील डीएन्एच्या सहाय्याने आदिमातेचा शोध लागला; कारण मिटोचोंड्रियन हा अवयव (ऑर्‌गॅनेल) आईकडून मुलाकडे संक्रमित होतो. त्यावर बापाच्या डीएन्एचा संकर झालेला नसतो. त्याचप्रमाणे पित्याचा शोध घेता येईल का? त्यासाठी असा डीएन्ए मिळाला पाहिजे की, जो बापाकडून मुलाकडे, आईच्या डीएन्एशी संकर न होता, जात असला पाहिजे. १९८७ नंतर शास्त्रज्ञानी वाय-गुणसूत्रातील डीएन्एचा शोध घेतला. वाय-गुणसूत्र (क्रोमोसोम) हे वडिलांकडून मुलाकडे (पुरुष) जाते. इथेही निरनिराळ्या समाजातील व्यक्तींची वाय-गुणसूत्रे घेऊन त्यातील डीएन्एची तुलना करून पाहाण्यात आली. ही तुलना करणे सोपे नव्हते, कारण इथे एका डीएन्एमध्ये कोटी-कोटी न्युक्लिओटाईड्स् असतात.

आपण पाहिले की, डीएन्ए मध्ये पडणाऱ्या फरकांच्या आधारे पृथ्वीच्या पृष्ठभागावर निरनिराळ्या ठिकाणी असणाऱ्या समाजांचा वंशवृक्ष तयार करता येतो. उदा. अंदमानातील समाज व भारतातील समाज यांच्यात भारतातील समाज अंदमानातील समाजाच्या किती आधी अस्तित्वात आला ते ठरविता येते. अशा रीतीने मागे जाता जाता आपण केनयातील समाजापर्यंत पोचतो. त्यातून मूळ आदिमानव कोणत्या मार्गाने स्थलांतर करीत गेला हे स्पष्ट होते. मनुष्याचा उगम पृथ्वीवर एकाच ठिकाणी झाला व नंतर तो जगभर कसा पसरला याचा शोध अशा तऱ्हेने तौलनिक-जनुक-शास्त्राच्या सहाय्याने घेता आला.

आपण पाहिलेच आहे की, स्थलांतराच्या या नकाशाला वस्तुरूप अवशेषांचा आधार नाही. पण दुसरा एक पुरावा मिळण्यासारखा होता व त्याचाही शोध शास्त्रज्ञांनी घेतला आहे. हा शोध घेण्याचा मार्ग म्हणजे मनुष्याच्या आश्रयाने जे जीवजंतू राहातात, उदा. उवा, त्यांच्या डीएन्एचे विश्लेषण करणे. मनुष्याच्या आतड्यात व्रण उत्पन्न करणारा एक जंतू माणसाच्या शरीरात राहातो. त्याच्या डीएन्एचा अभ्यास करता असे आढळले की, हा जंतू आफ्रिकेतून ५५ हजार वर्षांपूर्वी बाहेर पडून इतरत्र पसरला. पूर्व आशियातील या जंतूच्या डीएन्एची दक्षिण अमेरिकेतील याच जातीच्या प्रजेच्या डीएन्एशी तुलना करता असे निष्पन्न झाले की, ही दोन्ही ठिकाणची प्रजा एकाच प्रकारची आहे. यावरून पूर्वी माणसांच्या स्थलांतरणाविषयी काढलेला निष्कर्ष की, अमेरिकेतील मनुष्यजाति आशियातून आली असली पाहिजे, त्याला दुजोरा मिळतो.

(४)

गेल्या दहा वर्षांत तौलनिक-जनुक-शास्त्रात








अनुक्रमणिका

खूपच प्रगती झाली आहे. याला मुख्य आधार नामांकित संशोधन संस्थांनी एकत्र येऊन जगभर पसरलेल्या मनुष्य-समाजातील एक लाख व्यक्तींचे डीएन्ए जतन करून ठेवण्याचा प्रकल्प हाती घेतला, हा आहे. या साठविलेल्या डीएन्एचा उपयोगही मुळात कान आणि विल्सन यांनी केलेल्या संशोधनाचा पाठपुरावा करण्याचाच आहे. याच काळात डीएन्एच्या संपूर्ण विस्ताराचे अवलोकन करता येईल अशी साधने उपलब्ध झाली आहेत. त्यामुळे दोन डीएन्एची तुलना करताना काही 'एस्थान'वर अवलंबून न राहता सर्व एस्थान तपासता येऊ लागल्या. सूक्ष्म-उप-जनुकांचा अभ्यासही याच काळात सुरू झाला. या साऱ्या खटपटीतून माहितीचा मोठा खजिना उपलब्ध झाला. त्या माहितीचे विश्लेषण करून अनेक निष्कर्ष काढता आले.

यातील मुख्य निष्कर्ष हाच की, कान आणि विल्सन यांनी 'मनुष्याचे उगमस्थान केनयामध्ये होते व तेथून माणसे जगभर पसरली' हा जो कयास बांधला होता, तो बरोबर होता. मूळस्थानाहून काही माणसे बाहेर पडली. नव्या ठिकाणी वस्ती करून राहिली. तेथील लोकसंख्या वाढल्यावर नव्या ठिकाणाहून माणसे बाहेर पडली व दुसरी सोयीची जागा पाहून तिथे राहिली. ही प्रक्रिया १० हजार वर्षांपूर्वीपर्यंत चालू होती; ज्या काळात माणसे जगभर पसरली. अर्थात, त्यानंतरही नव्या वस्त्या वसवणे, नवी गावे उभारणे हे मनुष्यसमूहांचे उद्योग आजवर चालत आहेतच. पण त्यांना या प्रमुख स्थलांतरणाशी जोडता येणार नाही.

बुद्धिशाली मनुष्य असा हिंडत असताना त्याला मनुष्य-सदृश प्राणी - उदा. निअँडरथाल मनुष्य किंवा ताठ उभा राहाणारा मनुष्य (होमो इरेक्टस) - असे भेटले. पण बुद्धिशाली मनुष्य व हे मनुष्यसदृश प्राणी यांच्यात काही संकर झाल्याचा पुरावा आढळत नाही. अनेक-मूलस्थान-वादी, म्हणजे बुद्धिशाली मनुष्य पृथ्वीवर अनेक ठिकाणी उत्पन्न झाला असे मानणारे लोक, यांचे म्हणजे असे असते की, ताठ चालणारा मनुष्य (होमो इरेक्टस) व त्याच्याच सारखे मनुष्यसदृश प्राणी सुमारे १८ लाख वर्षांपूर्वी युरोप, आशिया, आफ्रिका अशा तिन्ही खंडात होते व त्या प्राण्यांपासून उत्क्रान्त होत बुद्धिशाली मनुष्य घडून आला. तथापि, आधुनिक काळात, म्हणजे गेल्या १० वर्षांत असा दावा करणारे शास्त्रज्ञ क्वचितच आढळतात. आता काही शास्त्रज्ञ असा युक्तिवाद करतात की, बुद्धिशाली मनुष्य (होमो सेपियन) आफ्रिकेत जन्माला आला, हे मान्य; पण एकदा आफ्रिकेतून बाहेर पडल्यानंतर या बुद्धिशाली मनुष्याचा इतरत्र जे मानवसदृश प्राणी अस्तित्वात होते त्यांच्याशी संकर झाला असला पाहिजे. आपण वर पाहिलेच आहे की, अशा संकराच्या जनुकीय खुणा सापडत नाहीत. त्यावर या मवाळ अनेक-मूलस्थान-वाद्यांचा युक्तिवाद असा की, मानवसदृश प्राण्यांच्या जनुकीय खुणा, बुद्धिशाली मनुष्यांचे जनुक अधिक उपकारक असल्यामुळे, पुसून गेल्या आहेत! अगदी अलिकडे (२००६ साली) काही शास्त्रज्ञांना निअँडरथल मनुष्याशी संकर झाल्याच्या खुणा सापडल्या आहेत, असे सांगितले जाते. एकूण हा प्रश्न अद्याप अनिर्णित आहे; बहुसंख्य शास्त्रज्ञ मात्र संकराचा पुरावा नाही, असे सांगणारेच आहेत.

तौलनिक-जनुक-शास्त्राचा उपयोग मनुष्याने नवीन वस्ती केल्यानंतर तेथील परिसराशी जुळवून घेताना त्याच्या डीएन्एमध्ये काय फेरफार झाले हे तपासण्यासाठीही होतो. हा डीएन्एत होणारा बदल उत्क्रांतीचा व नैसर्गिक निवडीचा पुरावा होय. शास्त्रज्ञांना असे आढळून आले आहे की, गेली ४० हजार वर्षे डीएन्एत होणाऱ्या बदलाचा वेग वाढतो आहे. (यासाठी आपल्याला प्राचीन काळातील मनुष्यांचे डीएन्ए मिळवावे लागतात. हे डीएन्ए प्राचीन हाडांपासून मिळतात.) आज देखील माणसाच्या डीएन्ए मधील मोठमोठ्या पट्ट्यातील काही न्युक्लिओटाईड्स् गळून जाण्याची व त्या ठिकाणी अधिक उपयोगी न्युक्लिओटाईड्स निर्माण होण्याची क्रिया चालू आहे. उदा. आजारांना तोंड देण्यासाठी लागणारे न्युक्लिओटाईड्स् डीएन्ए मध्ये घेतले जातात व दुर्बल न्युक्लिओटाईड्स् काढून टाकले जातात.

तौलनिक जनुक शास्त्राचा आतापर्यंत जो विकास झाला आहे. त्यावरून इतके म्हणता येते की, 'वंश' नावाची जी संकल्पना मनुष्यामात्राची व्यवस्था

लावण्यासाठी वापरली जात होती, तिला आता काही स्थान राहिलेले नाही. आजवर असे समजले जात होते की, कॉकेशियन वंशाची माणसे अधिक हुशार असतात, तर निग्रो वंशाची माणसे मंद असतात. समजा जनुक-शास्त्रीय संशोधनात असे आढळून आले की, युरोपीय मनुष्याच्या डीएन्‌एमंध्ये खरोखरच बुद्धिमत्तेला प्रोत्साहन देणारी विशिष्ट रचना आहे जी आफ्रिकी मनुष्याच्या डीएन्‌एमध्ये नाही; तर आपण जुन्या वंशवादी विचाराला यामुळे पाठिंबा मिळतो, असे म्हणू शकू का? यावर उत्तर असे आहे की, एका डीएन्‌एच्या अस्तित्वामुळे बुद्धिमत्तेत अकटो-विकट फरक पडतो असे नाही. तौलनिक-जनुक-शास्त्राला हे मान्य आहे की, भौगोलिक परिस्थितीमुळे व तिला तोंड देण्यासाठी मनुष्याला स्वतःच्या राहाण्याच्या शैलीत जे फरक करून घ्यावे लागले त्यामुळे परिस्थितिनुरूप फरक डीएन्‌एमध्ये साहजिकच पडले आहेत. पण त्यांना वांशिक फरक म्हणावे इतक्या मूलभूत स्वरूपाचे ते नाहीत.

तौलनिक-जनुक-शास्त्र हे नवीन विज्ञान आहे. पण गेल्या साठ वर्षांत त्या शास्त्रात झालेली प्रगती विस्मित करणारी आहे. त्या शास्त्रातून निर्माण झालेली प्रमेयेही मनुष्याच्या एकत्वाकडे होत असलेल्या वाटचालीला प्रोत्साहन देणारी आहेत.

(आधारित)

✣ ✣ ✣

**तळटीप :-**

१) याचा अर्थ असा नाही की, त्या वेळेस आफ्रिकेत (किंवा जगात) एकच स्त्री होती! इतर स्त्रियाही असतीलच; पण या आदिमातेची संतती जगली व वाढली. बाकीच्या स्त्रियांची प्रजा काळाच्या ओघात नष्ट झाली.

✣ ✣ ✣

## पत्रव्यवहार

संपादक

नवभारत मासिक,

स. न.

नवभारतच्या जून २००८ च्या अंकाने बरेच धक्के दिले आहेत. दत्ता मारुलकरांचे 'स्वरहिंदोळे' हे पुस्तक जितके रम्य तितके अ. द. मराठेंचे रसग्रहणही सुगम आहे. अनवट नाही या अर्थाने मारुलकर आता या जगात नाहीत ही वस्तुस्थिती सांगणारी तळटीप देणे आवश्यक होते.

२. विनोदाची मीमांसा करणारा साक्षी गुप्त राहू इच्छितो हाही एक विनोदच.

३. अरुण रंधे शिक्षक 'ढ' मुलाकडे बघून त्यांना वाईट वाटते ते आत्मपरीक्षण करतात पण या तशी 'ढ' नसलेली मुले पूर्णावस्थेत आल्यावर मात्र 'ढ' न राहता अलीकडच्या 'ड' वर्गात राहून काय काय उद्योग करतात ते माझ्यासारख्या बँकेत नोकरी करणाऱ्यांना कळते. (अर्थात् ढ जितके अल्पप्रमाणांत तद्वत् ड फॉर डॅम्बीसही थोडेच.)

४. आता लोकमान्य ते महात्मा! श्री. मा. भावे यांनी सहा लेख लिहूनही तेही साधार नि सविस्तर. मोरे गप्प का आहेत? टीका पटली की दुर्लक्ष करण्यायोग्य वाटली? नेमके काय समजावे? 'लो ते म'ला सतत पुरस्कार लाभत आहेत. ते योग्यही आहे. विशिष्ट अर्थाने. पण या सहा लेखावर खुलासेवार निदान एक तरी लेख मोऱ्यांचा नवभारतात हवाच. शिवाय नित्य संपादकीय हवे.

**श्रीधर वि. सहस्रबुद्धे**

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

सुधारित किंमत
२० नोव्हेंबर २००६
पासून लागू

- ❑ **वैदिक संस्कृतीचा विकास** (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी — ३०० रु.
- ❑ **अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर** (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती — २०० रु.
- ❑ **पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास** । डॉ. सुमंत मुरंजन — १२० रु.
- ❑ **हिंदी साहित्यविचार** । प्रा. प्यारेलाल गोहेल — २५ रु.
- ❑ **श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ** — ६० रु.
- ❑ **संशोधन साधना** । डॉ. वसंत स. जोशी — ६० रु.
- ❑ **तरंगयामिक व पुंजयामिक** । मा. ग. टोळे — २० रु.
- ❑ **आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास** । ऋग्वेदी — १५० रु.
- ❑ **वागीश्वरी** । डॉ. गो. के. भट — ६० रु.
- ❑ **प्रस्थानभेद** (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. बा. लेले — ५० रु.
- ❑ **गिर्यारोहण परिचय** । अच्युत खोडवे — ४० रु.
- ❑ **इतिहासाचे तत्त्वज्ञान** (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले — १३० रु.
- ❑ **दासशूद्रांची गुलामगिरी** (भाग २) । शरद पाटील — १५० रु.
- ❑ **शाहीर हैबती** । डॉ. शिवाजीराव चव्हाण — ४० रु.
- ❑ **गीताचिकित्सा** । भाऊ धर्माधिकारी — १४० रु.
- ❑ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** (चरित्र) । सौ. मालती देशपांडे — २५ रु.
- ❑ **बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार** । प. ल. वैद्य — ५० रु.
- ❑ **हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन** (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे — १६० रु.
- ❑ **पाच पुस्तक-परीक्षणे** । वा. म. कुलकर्णी — ६० रु.
- ❑ **भेदविलोपन : एक आकलन** । अशोक केळकर — ३० रु.
- ❑ **कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य** । रा. भा. पाटणकर — १०० रु.
- ❑ **धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार** । दि.के. बेडेकर — ३० रु.
- ❑ **आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार** — १०० रु.
- ❑ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार** — १५० रु.
- ❑ **इहवाद आणि सर्वधर्मसमभाव** । मे. पुं. रेगे — १२० रु.
- ❑ **प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा** — २०० रु.
- ❑ **चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान** (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले — १०० रु.
- ❑ **विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे** (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर — १२० रु.
- ❑ **नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन** । द.ना. धनागरे — ४० रु.
- ❑ **प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती** (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे — ५५० रु.
- ❑ हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी — २२५ रु.
- ❑ पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) । प्रा. मे. पुं. रेगे — १६० रु.

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : **चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)**

हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




